साने गुरुजींच्या गोड गोष्टी : १

# खरा मित्र





करी मनोरंजन जो मुलांचे । जडेल नाते प्रभुशी तयाचे ॥



सानेगुरुजींच्या गोड गोष्टी सानेगुरुजींच्या गोड गोष्टी सानेगुरुजींच्या गोड गोष्टी



''करी मनोरंजन जो मुलांचे।
जडेल नाते प्रभुशी तयाचे।।''





गोड गोष्टी : भाग पहिला

# खरा मित्र










: लेखक :

सानेगुरुजी, एम्. ए.




सानेगुरुजींच्या गोड गोष्टी सानेगुरुजींच्या गोड गोष्टी सानेगुरुजींच्या गोड गोष्टी






किंमत १५ रूपये

**केशव भिकाजी ढवळे संस्था शताब्दी वर्ष गणेशचतुर्थी १९०० ते २०००**

पहिली आवृत्ती १९४१,
**सव्वीसावी आवृत्ती १९९१**
पुनर्मुद्रणे १९९२, १९९३, १९९४
१९९६, १९९८
बत्तिसावे पुनर्मुद्रण १९९९

**टाईपसेटिंग**
अक्षय फोटो टाइपसेटर्स
१- चित्रकूट
डॉ. आंबेडकर मार्ग, ठाणे ४०० ६०१

**मुद्रक**
जस्मिन आर्टस्
सदाशिव गणेश परूळकर
वडाळा उद्योग भवन
वडाळा, मुंबई ४०० ०३१

**प्रकाशक**
ज्योती धनंजय ढवळे
केशव भिकाजी ढवळे
पहिली भटवाडी, गिरगाव,
मुंबई ४०० ००४

# गोड गोष्टींची कथा

प्रत्येक समाजात लोककथा आहेत. खेड्यापाड्यांतून या पसरलेल्या आहेत. जगातील हे लोककथांचे वाङ्मय तोंडातोंडी प्राचीन काळी पसरे. येणाऱ्या व्यापाऱ्यांबरोबर हे वाङ्मय येई. दळणवळणाबरोबर हे वाङ्मयही प्रवास करी. जगातील लोककथांत पुष्कळसे साम्य आढळते. गोड गोष्टींच्या या पहिल्या भागात ज्या लोककथा आज मी देत आहे त्या बंगालमधील आहेत. बंगाली लोककथांचे इंग्रजी पुस्तक पुष्कळ वर्षांपूर्वी मी वाचले होते. त्यातील गोष्टी मी शेकडो मुलांना घरी, दारी, शाळेत सांगितल्या आहेत. त्या गोष्टी मुलांना फार आवडत. त्या गोष्टी मी जशा सांगे तशा लिहून काढल्या आहेत. गोष्टींचा धागा मूळ बंगालातील परंतु माझ्या भाषेत आठवणीने मी त्या लिहून काढल्या आहेत. त्यामुळे हे भाषांतर असे नाही. गोष्टींचा हा पहिला भाग आवडला तर दुसरेही प्रसिद्ध करता येतील. या सर्व गोष्टींना मी 'गोड गोष्टी' असे नाव देणार आहे. गोड गोष्टींच्या अनेक भागांतून अनेक प्रकारच्या गोष्टी येतील. गंमतीच्या येतील, गंभीर येतील; हसवणाऱ्या येतील, रडवणाऱ्या येतील, विनोदी येतील, बोधपर येतील, ऐतिहासिक येतील, काल्पनिक येतील. त्या मुलाबाळांना गोड लागोत. मुलांची ही सेवा मुले गोड करून घेवोत.

**साने गुरुजी**

अमळनेर, ३०।७।४०



भाग पहिला : खरा मित्र

# अ नु क्र म णि का




आवडती नावडती – – – – ५

तीन मडकी – – – – – – १४

न्याय देणारा गुराखी – – – – – २५

गोसावी – – – – – – – ३३

सोन्याची साखळी – – – – – ४२

खरा मित्र – – – – – – – ५५



खरा मित्र : कथा पहिली

# आवडती नावडती



एक होता गाव. त्या गावात एक मनुष्य होता. त्याला दोन बायका होत्या. एक होती आवडती व एक होती नावडती. जी नावडती होती ती दिसायला चांगली नव्हती. तिला फार कष्ट पडत. कोंबडा आरवल्यापासून ती कामाला लागे. ती दिवसभर सारखे काम करी. विहिरीचे पाणी तीच भरी. नदीवर धुण्याची मोट घेऊन तीच जाई. गुराढोरांचे तीच करी. दळणकांडण तीच करी. खटाळभर खरकटी भांडी तीच घाशी. झाडलोट, सडा–सारवण, दिवाबत्ती, सारे तीच करी. क्षणाचीही तिला विश्रांती नसे. इतके काम करूनही तिच्याजवळ कोणी गोड बोलत नसे. तिला गोड घास मिळत नसे. तिच्या वाट्याला रोज उठून शिळवड असायची. नेसू फाटके जुनेर असायचे. निजायला फटकुर मिळायचे. तिच्या अंगाखांद्यावर मणीमंगळसूत्राशिवाय काही नव्हते. हातात नीटसा बिल्वरही नव्हता. दागदागिन्यांचे एक असो मेले. त्याच्यावाचून माणसाचे अडत नाही; परंतु फुकाचा गोड शब्द, तोही महाग असावा? परंतु या जगात गोड बोलण्याचाही पुष्कळदा दुष्काळच असतो.

नावडतीची सवत तिला चारचौघांदेखत घालूनपाडून बोलायची. सर्वांच्यादेखत अपमान करायची. चारचौघांत अपमान होण्यापेक्षा मरण बरे असे माणसास वाटते. नावडती मनात म्हणे, 'मेलं मर मर मरावं, उरापोटी काम करावं; परंतु त्याचं चीज नाही. शिव्या, शाप व निंदा, अपमान यांची वर बक्षिशी'' मनुष्य कामाला कंटाळत नाही. 'दमलास हो' असे गोड शब्द त्याच्या जवळ बोला की त्याचा थकवा दूर जातो. मनुष्य प्रेमाचा भुकेलेला आहे. नावडतीला या

जगात प्रेम मिळेना. ज्याला सहानुभूती मिळत नाही, प्रेम मिळत नाही, त्याच्याहून अधिक अभागी व दुःखी दुसरे कोण आहे?

मनुष्याच्या सोशिकपणालाही काही मर्यादा आहे. अधिक ताणल्याने तुटते. नावडती एक दिवस वैतागली. ती जिवाला कंटाळली. देव निष्ठुर आहे असे तिला वाटले. कशाला या जगात राहा, असे मनात म्हणून ती बाहेर पडली. त्या जिवंत नरकातून, त्या कोंडवाड्यातून ती बाहेर पडली. बाहेर बरीच रात्र झाली होती. सर्वत्र सामसूम होते. दूर काही कुत्री भुंकत होती. कोल्ह्यांची हुकीहुकी मधून मधून ऐकू येत होती. एखाद्या पक्ष्याचे मध्येच दीनवाणे ओरडणे कानावर येई. आकाशात चंद्र नव्हता. कृष्णपक्ष होता. बाहेर अंधार होता. ताऱ्यांचा काय प्रकाश मिळेल तो खरा.

ती नावडती चालली. एकटी चालली. तिचे दुःख तिच्याबरोबर होते. तिचे अश्रू तिच्याबरोबर होते. तिच्या पायांत काही नव्हते. रस्ता दिसत नव्हता. काटे बोचत होते, दगड टुपत होते, परंतु सवतीने दिलेल्या शिव्याशापांपेक्षा त्या काट्यांचे बोचणे, त्या दगडाधोंड्यांचे टुपणे अधिक दुःखदायी नव्हते. ठेचाळत, अडखळत ती जात होती.

आता रात्र संपत आली. झुंजुमुंजू झाले. दंवबिंदू टपटप पडत होते. ते का नावडतीसाठी रडत होते? झाडांवर बसल्या बसल्या पाखरांची किलबिल सुरू झाली. झाडांच्या आकृत्या हळुहळू स्पष्ट दिसू लागल्या. दिशा फांकू लागल्या. प्रकाश पसरू लागला; परंतु नावडतीच्या मनात अंधारच होता. जग जागे होत होते. नावडती कायमचीच झोपायला जात होती.

दाट जंगल समोर होते. त्या जंगलातून ती चालली. जाता जाता काय मजा झाली, नावडती ज्या पायवाटेने जात होती, तिच्या जवळच एक तुळशीचा माडा उगवलेला होता. नावडतीचे त्या तुळशीच्या माड्याकडे लक्ष गेले. जाणाऱ्यायेणाऱ्यांनी त्या तुळशीची पाने ओरबाडून खाल्ली होती. ते तुळशीचे झाड दीनवाणे दिसत होते. ती नावडती त्या तुळशीजवळ गेली व तिला नमस्कार करून म्हणाली, 'जय आई तुळसादेवी, तुला वाटेच्या वाटसरूंनी ओरबाडून खाल्ले. तुझी पानांची संपत्ती त्यांनी सारी लुटली; परंतु तुला कोणी पाणी घातले नाही, तुझ्या उघड्या मुळांवर कोणी माती लोटली नाही. थांब हो. मी घालते मुळाशी माती, मी देत्ये तुला पाणी -' असे म्हणून नावडती आजूबाजूला पाणी

पाहू लागली. एक लहानसा ओढा खळखळ करीत वहात होता. पळसाच्या पानांचा नावडतीने द्रोण केला. त्या द्रोणाने तिने पाणी आणून त्या तुळशीला घातले. आजूबाजूचे रान उपटून तुळशीच्या मुळाशी तिने माती घातली. नंतर तिला नमस्कार करून ती नावडती पुढे निघाली.

मनात विचार करीत ती चालली होती. भेटेल एखादे तळे, दिसेल एखादी नदी, असेल मोठा डोह, त्याच्यात जीव देऊ असे मनात म्हणत ती जात होती. तो काय झाले, तिला एक देवकापसाचे झाड दिसले. देवकापूस छान असतो, त्याचा धागा सुंदर दिसतो. बायका वाती वगैरे बहुधा या कापसाच्या करतात. म्हणून याला देवकापूस म्हणतात. त्या देवकापशीवरची बोंडे जाणाऱ्यायेणाऱ्यांनी तोडून नेली होती. त्या झाडाची ती शुभ्र पांढरी दौलत सर्वांनी लुटली; परंतु त्याची काळजी कोणी केली नाही. ना घातली मुळाशी मूठभर माती, ना घातले थेंबभर पाणी. सारे फुकट घेणारे. नावडती त्या झाडाजवळ गेली. जगात सहानुभूती जर मिळाली नाही, कोणी विचारपूस केली नाही, तर जिणे कसे असह्य होते, त्याचा तिला अनुभव होता. ती त्या कापशीच्या झाडाजवळ गेली व म्हणाली, 'उगी, रडू नको कापशीच्या झाडा. मी घालते हो तुला पाणी, मी घालते मुळाशी माती.' असे म्हणून तिने त्याला पाणी घातले, मातीही घातली. नंतर ती पुढे गेली.

ती आता अधीर झाली होती. अजून कसे आढळत नाही एखादे तळे, एखादी विहीर, एखादा नदीचा डोह असे म्हणत होती. तो वाटेत एक पेरूचे झाड दिसले. येणाऱ्याजाणाऱ्यांनी त्याचे पेरू नेले होते, खाल्ले होते. नीट पिकण्याचीही कोणी वाट बघ.. नसत. मारीत दगड. पाडीत पेरू. पाखरांनाही पेरू राहात नसत. कारण पाखरे पेरू पिकला म्हणजे खातात; परंतु माणसाला कुठला धीर. तो आधीच खाऊन टाकी. पाखरे म्हणत, 'हा मनुष्य प्राणी साऱ्या दुनियेचा हावरा दिसतो. भारीच आधाशी सर्वभक्षक आहे.' परंतु ही नावडती तशी नव्हती. ती त्या पेरूच्या झाडाजवळ गेली व म्हणाली, 'पेरूच्या झाडा, कोणी तुझी विचारपूस केली नसेल, पाणी घातले नसेल; मी घालते हो तुला पाणी, घालते मुळाशी माती.' तिने त्याप्रमाणे केले व ती पुढे गेली.

ते दाट जंगल संपले व मोकळे मैदान सुरू झाले. सूर्य बराच वर आला होता. आता पायही भाजू लागले; परंतु इतक्यात एक मोठे तळे दिसले. तळे



कसले, ते सरोवरच जणू होते. सुंदर कमळे फुलली होती. पाण्यावर मंद लाटा नाचत होत्या. पाण्यात हंस वगैरे पक्षी नावांप्रमाणे डोलत होते. त्या सरोवराला एका बाजूला घाटही बांधलेला होता. नावडती त्या घाटावर जाऊन उभी राहिली. तिचा निश्चय झाला. तिने पदर बांधला. ती आता पाण्यात उडी घेणार तोच 'हे अभागी जीवा, थांब, असा जीव देऊ नकोस.' असे शब्द तिच्या कानांवर आले.

कोठून आले ते शब्द ? अनाथांचा नाथ, दीनांचा कैवारी असा कोण तेथे होता ? तेथे एक साधू राहात असे. बाईच्या हावभावांवरून ती जीव देणार असे त्याने ओळखले. त्याचेच ते शब्द होते. ते शब्द ऐकून नावडती चपापली, दचकली. हे जग मला नीट जगूही देत नाही, सुखाने मरूही देत नाही. दुष्ट आहे जग असे तिला वाटले.

तो साधू जवळ आला. तो प्रेमळपणे बाईला म्हणाला, 'तुम्ही जीव का देता ? देवाने दिलेला सोन्यासारखा देह का बरे पाण्यात फेकता ? हा देह सेवेत राबवावा, परोपकारात झिजवावा, आत्महत्या म्हणजे सर्वांत मोठे पाप. नका. असा अविवेक करू नका. माझे ऐका.'

नावडती म्हणाली, 'महाराज, तुम्ही म्हणता ते खरे. आत्महत्या करणे हे मोठे पाप म्हणून तर आजपर्यंत थांबल्ये; परंतु अत:पर थांबवत नाही, धीर धरवत नाही. कशाच्या आशेवर मी जगू, जगात दिवस काढू? प्रेमाचा एक शब्द मला मिळत नाही. सुखाचा घास लाभत नाही. मेलं मर मर मरावं परंतु त्याचं चीज होत नाही. मरू दे मला. मी मेल्ये तर कोणी रडणार नाही. मरणाचे सुख तरी मिळू दे मला.'

साधू म्हणाला, 'कसले तुम्हाला दु:ख आहे?'

नावडती म्हणाली, 'मी आहे नावडती. आवडतीचे सारे गोड. माझे सारे कडू. देवाने रूपलावण्य नाही मला दिले. यात माझा काय दोष? परंतु म्हणून मला छळतात, गांजतात; वाटेल तसे बोलतात. हाल करतात. कुरूप स्त्रीने कशाला जगावे? देव फुलांना, फुलपाखरांना कसे नटवतो; परंतु माझ्याच वेळी त्याचं सारं संपलं वाटतं. असो. आपले नशीब. जाऊ दे मला, घेऊ दे उडी.'

साधू म्हणाला, 'थांब. नको उडी घेऊ. मी तुला रूपलावण्य देतो. देवाचे नाव घेऊन या पाण्यात तीन वेळा बुचकळून बाहेर ये. अप्सरेप्रमाणे दिसू लागशील. खरेच सांगतो.'

नावडतीने विश्वास ठेवला. साधूला तिने नमस्कार केला. साधू निघून गेला. नंतर तिने देवाचे नाव घेऊन तीन वेळा पाण्यात बुचकुळी मारली आणि खरेच ती फार सुंदर दिसू लागली. जणू राजाची राणी. स्वर्गातील रंभा अशी दिसू लागली.

ती घरी परत जावयास निघाली. मनात साधूचे उपकार मानीत, त्याची स्तुती गात ती निघाली. आपला नवरा आता आपणावर प्रेम करील, हिडिसफिडिस करणार नाही असे मनात येऊन तिला किती तरी आनंद होत होता. संपली साडेसाती असे तिला वाटले. तिला आता दगड टुपत नव्हते, काटे बोचत नव्हते. जणू पायाखाली सर्वत्र फुलेच पसरली होती.

पुन्हा ते जंगल आले. त्या जंगलातून ती जात होती. वेगाने जात होती. इतक्यात 'अहो बाई, थांबा, इकडे या.' असे शब्द तिच्या कानांवर आले. आजूबाजूस कोणी माणूस तर दिसेना. कोणी मारली हाक, कोणाचे ते शब्द? भ्रम झाला असावा असे मनात येऊन ती पुन्हा चालू लागली परंतु ते शब्द पुन्हा कानांवर आले. भास नाही, कोणी तरी खास बोलावते आहे असे तिला

वाटले. तो तिला ते पेरूचे झाड दिसले. ते झाड जणू आनंदाने डोलत होते. नावडती त्याच्या जवळ गेली व म्हणाली, 'काय रे पेरूच्या झाडा, तू का हाक मारलीस?'

झाड म्हणाले, 'हो.'

'का हाक मारलीस?' तिने विचारले.

'का म्हणून काय विचारता? तुम्ही स्वतः दुःखी होत्यात. तरी माझी विचारपूस केलीत. मला ओंजळभर पाणी घातलेत, चार मुठी माती मुळाशी घातलीत. आजपर्यंत सर्वांनी मला लुटले; परंतु असे कोणी केले नाही. तुम्ही कच्चा दोडाही तोडलात नाही आणि शिवाय हे प्रेम दिलेत. तुम्ही थोर आहांत. तुमचे उपकार कसे विसरू, प्रेम कसे विसरू? आम्ही झाडे माणसांप्रमाणे कृतघ्न नसतो. तोडणाऱ्यावरही आम्ही छाया करतो. दगड मारणारालाही फळे देतो. मग प्रेम देणाऱ्यांबद्दल आम्हाला किती बरे प्रेम वाटत असेल? प्रेमाचे ऋण कधी फिटत नसते. तरीही तुम्हाला मी काही तरी देणार आहे. ते घ्या. नाही म्हणू नका.' असे ते पेरूचे झाड म्हणाले.

'काय देणार मला, प्रेमळ पेरूच्या झाडा?' तिने विचारले. 'एक लहानशी करंडी.' 'करंडीत काय असेल?' 'करंडीत वाटेल ते फळ, वाटेल तितके मिळेल. डाळिंब हवे असेल तर डाळिंब. द्राक्षे हवी असतील तर द्राक्षे. घ्या ही करंडी, माझ्या प्रेमाची खूण.'

ती करंडी घेऊन नावडती पुढे चालली. काही अंतर चालून गेल्यावर 'अहो बाई, थांबा, इकडे या.' असे शब्द पुन्हा तिच्या कानांवर आले. ती इकडेतिकडे पाहू लागली. ते देवकापशीचे झाड तेथे होते. ते हाक मारीत होते. नावडती त्याच्याजवळ जाऊन म्हणाली, 'कापशीच्या झाडा, तू का हाक मारलीस?'

'हो. मी हाक मारली.'

'का बरे?'

'असे का म्हणून विचारता? आजपर्यंत माझी बोंडे तोडून नेणारेच मला भेटले; परंतु प्रेमाने चौकशी करून मला पाणी देणारे, माझ्या उघड्या पडलेल्या मुळांवर माती लोटणारे कोणी भेटले नव्हते. तुम्ही भेटलात. किती बाई तुमचा प्रेमळ व परोपकारी स्वभाव! प्रेमाचे उतराई होता येत नाही; परंतु राहावत

नाही म्हणून काही तरी प्रेमाची भेट द्यायची. मी तुम्हाला काही तरी देणार आहे. आम्ही झाडे केलेले उपकार स्मरतो. आम्ही माणसांप्रमाणे कृतघ्न नाही.'

'काय रे देणार कापशीच्या झाडा?'

'एक लहानसे गाठोडे देणार आहे. दुसरे काय आहे माझ्याजवळ?'

'गाठोड्यात काय असेल?'

'हवे असेल ते वस्त्र त्यात मिळेल. रेशमी लुगडी, जरीची लुगडी, शेला, शालू, पितांबर. पैठणी सर्व काही मिळेल. नेहमी मिळेल.'

'बरे तर. तुझी प्रेमाची आठवण घेऊन जाते.'

गाठोडे घेऊन नावडती पुढे निघाली. आता झपझप ती जात होती. घरी केव्हा पोचू असे तिला झाले होते. तो 'अहो बाई, थांबा, इकडे या.' असे शब्द पुन्हा कानांवर आले. तिने पाहिले तो टवटवीत झालेली तुळस तेथे उभी होती.

'जय आई तुळसादेवी, तू का मुलीला हाक मारलीस?'

'होय बेटा. तू मला पाणी घातलेस, मुळाशी माती घातलीस. कोणी नाही हो असे आजपर्यंत केले. हजारो या वाटेने आले गेले; परंतु कोणी असे केले नाही. तुझ्यावर मी प्रसन्न आहे. तुला काही देणार आहे.'

'काय देणार आई?'

'एक लहानसा करंडा.'

'त्यात काय असेल?'

'त्यात पाहिजे असेल तो दागिना मिळेल. सोन्याचांदीचे, हिऱ्यामोत्यांचे हवे असतील ते अलंकार मिळतील. घे हो हा करंडा.'

नावडतीने तो करंडा घेतला. नमस्कार करून ती निघाली. एके ठिकाणी ती थांबली. तिला भूक लागली होती. करंडीतील फळे काढून तिने पोटभर फलाहार केला. नंतर त्या गाठोड्यातून सुंदर वस्त्रे काढून तिने ती परिधान केली आणि मग करंड्यातील मौल्यवान सुंदर अलंकार तिने अंगावर घातले. किती सुंदर दिसत होती ती. जणू वनदेवताच!

नावडती घरी आली. ती लक्ष्मीप्रमाणे उभी राहिली. नवरा तिच्याकडे पाहातच राहिला. ती आता त्याची आवडती झाली. पहिली नावडती झाली.

एके दिवशी नवीन आवडतीला नवीन नावडतीने, 'बाई, तुम्ही कोणते उपाय केलेत असे रूपलावण्य मिळावे म्हणून? मला तरी सांगा. तसेच ती करंडी, तो करंडा, ते गाठोडे कोणी दिले? कोणा देवाची तुम्ही आराधना केलीत? कोणते व्रत केलेत, कोणता वसा घेतलात? सांगा मला सारे. नाही म्हणू नका. मी छळले ते मनात आणू नका.'

'ती नवीन आवडती साधी सरळ स्वभावाची. तिला कपट माहीत नाही. तिला खोटे बोलणे माहीत नाही. जणू मोकळी निर्मळ गंगा, अशी ती होती. तिने सारी हकीगत सांगितली.

एके दिवशी ती नवीन नावडती रानात गेली, परंतु तिने तुळशीला पाणी घातले नाही. तिची पाने मात्र खाल्ली, तिने देवकापशीला पाणी घातले नाही, बोंडे मात्र तोडली, तिने पेरूच्या झाडाला पाणी घातले नाही, दगड मारून पेरू पाडले, असे करीत ती पुढे गेली. त्या सरोवराच्या काठी जाऊन उभी राहिली. जीव देण्याचे सोंग केले. 'अहो बाई, थांबा; जीव काही देऊ नका.' असे शब्द तिच्या कानांवर आले. ती त्या शब्दांची वाटच पाहात होती. साधू तेथे आला. त्याने विचारले, 'का देता जीव?'

डोळ्यांत खोटे अश्रू आणून ती म्हणाली, 'पूर्वी माझा नवरा माझ्यावर प्रेम करी; परंतु आता ते मजजवळ गोड बोलत नाहीत, मला पाहून हसत नाहीत. मी आता डोळ्यांसमोरही त्यांना नकोशी झाल्ये आहे. काय करावे? पतिप्रेम नसेल तर बायकांना जिणे नको वाटते. जाऊ दे मला, घेऊ दे उडी.'

साधू म्हणाला, 'हे नवरे सारे स्वतः का मदनाचे पुतळे असतात? स्वतः असतात कुरूप परंतु बायको मात्र पाहिजे अप्सरा आणि तुमचे रूप काही तसे वाईट नाही. बरे ते असो. जीव काही देऊ नका. या पाण्यात देवाचे नाव घेऊन तीनदा बुचकळी मारा. म्हणजे आहे ह्यापेक्षाही तुमचे सौंदर्य अधिक होईल.

असे सांगून साधू निघून गेला. तिने त्याला नमस्कारही केला नाही. पाण्यात एक बुचकळी मारून ती वर आली तर खरेच पूर्वीपेक्षा ती अधिक सुंदर दिसू लागली. मग तिने दुसरी बुचकळी मारली. तो आणखीच सुंदर झाली. तिने तिसरी बुचकळी मारली. ती आता केवळ सौंदर्याची खाण अशी दिसू लागली. तिच्या मनात असे आले की आणखी एक बुचकळी मारावी. तिने चौथी बुचकळी मारली. तो काय आश्चर्य! तिचे सारे रूपलावण्य नाहीसे झाले. तिचे शरीर

कोळशासारखे काळे काळे झाले. नाक नकटे झाले. डोळे बटबटीत दिसू लागले. ती रडू लागली. रडत रडत त्या साधूच्या झोपडीजवळ ती आली. तो साधू बाहेर आला. पाया पडून ती म्हणाली, 'महाराज, क्षमा करा. तुम्ही तीन बुचकळ्या मारायला सांगितले, परंतु मी चौथी मारली. माझे सारे रूप गेले. येऊ दे पुन्हा माझे रूप, करा एवढी कृपा.'

साधू म्हणाला, 'ती शक्ती मला नाही. 'अतिलोभो न कर्तव्यः' हे खरे आहे. अती तेथे माती आणि शिवाय माझ्या शब्दांवर विश्वास ठेवलात नाही. मला एक प्रकारे फसवलंत तुम्ही. जा आता. भोगा कृतकर्माची फळे.'

ती नवीन नावडती मरायला थोडीच आली होती! मरण्याचे तिला धैर्य नव्हते. रडत रडत ती परत निघाली. 'मारतील दोन लाथा परंतु खायला तर देतील' असे मनात म्हणत होती. वाटेत तिला कोणी हाक मारली नाही. ना करंडा ना करंडी, ना गाठोडे ना काही. हात हलवीत परत आली. काळीकुंद्री होऊन मात्र आली.

घरी येऊन दारी उभी राहिली. तिला कोणी ओळखीना; परंतु मग डोळ्यांत पाणी आणून म्हणाली, 'बाई, मला ओळखलंत नाही का? मी ती पूर्वीची तुम्हाला छळणारी आवडती. पुन्हा आवडती होण्यासाठी म्हणून रानात गेले. परंतु तीनदा बुडी मारून पुन्हा अती लोभाने चौथ्यांदा मारली. त्याचे हे फळ. माझे सारे रूपलावण्य गेले. मी ही अशी झाल्ये. मला क्षमा करा सर्वांनी. येथे मला राहू दे.'

ती नवीन आवडती म्हणाली, 'राहा हो बाई. हे तुमचे माझे दोघींचे घर. तुम्ही मला छळलंत, परंतु मी तुम्हाला छळणार नाही. ज्या दुःखातून मी गेल्ये ते तुम्हाला भोगू देणार नाही. झाले ते झाले. उगी. रडू नका, पुसा डोळे. आपण दोघी सुखाने नांदू.'

आणि खरोखरच त्या सुखाने नांदू लागल्या.

इटकुली मिटकुली गोष्ट ऐकणारांचे अभीष्ट.





खरा मित्र : कथा दुसरी

# तीन मडकी



एक होता गाव. त्या गावात एक मनुष्य राहात होता. त्याचे नाव होते भिकंभट. तो फारच गरीब होता; परंतु त्याचे कुटुंब फार मोठे होते. बायको होती. चार कच्चीबच्ची होती. घरात खाण्यापिण्याची सदैव पंचाईत पडायची. कधी कधी नवराबायकोचे कडाक्याचे भांडणही होई. त्या वेळेस मुले रडू लागत. शेजारीपाजारी मात्र हसत व गंमत बघत.

एके दिवशी तर गोष्टी फारच निकरावर आल्या. भिकंभट ओसरीत बसले होते. घरात खाण्यासाठी पोरे आईला सतावीत होती. सावित्रीबाई शेवटी एकदम ओसरीत येऊन गर्जना करू लागल्या, 'काय द्यायचे पोरांना खायला? घरात एक दाणा असेल तर शपथ. बसा येथे ओटीवर मांडा ठोकून. संसार चालवता येत नाही तर लग्न कशाला केलेत? नेहमी गावात चकाट्या पिटा. पानसुपाऱ्या खायच्या, पिचकाऱ्या मारायच्या. दुसरा उद्योग नाही तुम्हाला. काही जनाची नाही तर निदान मनाची तरी लाज. लोकांजवळ तरी कितीदा तोंड वेंगाडायचे? ही पोरे घेऊन विहिरीत जीव द्यावा झाले. शंभरदा सांगितले की काही थोडे फार तरी मिळवून आणा. कोठे बाहेर जा, उद्योगधंदा पाहा; परंतु घरकोंबडे येथेच माशा मारीत बसता. मला तर नको हा संसार असे वाटत आहे.'

सावित्रीबाईंचा पट्टा सारखा सुरू होता. बिचारे भिकंभटजी. त्यांना कोण देणार नोकरी चाकरी? कोणतेही काम त्यांना येत नसे; परंतु त्या दिवशी त्यांना फार वाईट वाटले. बायको रोजच बोलत असे; परंतु आज त्यांचा स्वाभिमान जागा झाला होता. त्यांची माणुसकी जागी झाली. एकदम उठले व म्हणाले, 'आज पडतो घराबाहेर. काही मिळवीन तेव्हाच घरी परत येईन. पोराबाळांचे

पोट भरण्यास समर्थ होईन तेव्हाच परत तोंड दाखवीन. ही तोपर्यंत शेवटचीच भेट.' परंतु सावित्रीबाईंस त्या बोलण्याने तेवढेसे समाधान झाले नाही, त्या चिडविण्याच्या आवाजात म्हणाल्या, 'आहे माहीत तुमची प्रतिज्ञा. आजपर्यंत सतरांदा जायला निघालेत; परंतु अंगणाच्या बाहेर पाऊल पडले नाही. जाल खरोखरच तेव्हा सारे खरे.' भिकंभट खरोखरच घरातून बाहेर पडले. लांबलांब चालले. पाय नेतील तिकडे जात होते. कोणाकडे जाणार, कोठे जाणार? ना कोठे ओळख, ना कोणापाशी वशिला. दमेपर्यंत चालत राहावयाचे असे त्यांनी ठरविले होते. शेवटी ते अगदी थकून गेले. पोटात काही नव्हते. एक पाऊलही पुढे टाकवेना. शेवटी एका झाडाखाली ते रडत बसले.

त्या वेळेस शंकर आणि पार्वती तिकडून जात होती. पार्वती शंकराला म्हणाली, 'देवा, रडण्याचा आवाज कानांवर येत आहे. कोणी तरी दुःखी मनुष्य जवळपास असावा. चला, आपण पाहू.' ती दोघं कोण रडतो ते शोधू लागली. त्यांना झाडाखालचा भिकंभट दिसला.

'तो पाहा रडणारा माणूस. चला का रडतोस ते त्याला विचारू. चला देवा.' पार्वती म्हणाली.

भगवान शंकर म्हणाले, 'या जगातील लोक एकाच गोष्टीसाठी रडत असतात. त्यांना पैसा पाहिजे, धनदौलत पाहिजे, परंतु जगाला देऊन देऊन आपण भिकारी झालो. आता आपणाजवळ देण्यासारखे काय बरे आहे? नाही म्हणायला भस्म आहे. त्याला का पडगुलीभर भस्म देऊ?'

पार्वती म्हणाली, 'देवा, आपणाजवळ अद्याप तीन मडकी शिल्लक आहेत. ती आहेत तोपर्यंत तरी काय द्यावे ही पंचाईत नाही. चला जाऊ त्या दुःखी माणसाकडे. दुःखी मनुष्य पाहून माझ्याने पुढे जाववत नाही.'

भगवान शंकर म्हणाले, 'तू पर्वताची मुलगी म्हणून तुला पार्वती म्हणतात, परंतु तुझे हृदय पर्वतासारखे कठीण नाही. तुझे हृदय इतके लोण्याप्रमाणे मऊ कसे?'

पार्वती म्हणाली, 'देवा, माझा पिता हिमालय काही कठोर नाही. त्याच्या पोटातून सिंधू, ब्रह्मपुत्रा, गंगा, यमुना वगैरे शेकडो नद्या वाहातात. माझ्या पित्याचे हृदय दयेने भरलेले आहे; परंतु ते राहू दे. चला त्या दुःखी माणसाकडे व पुसू त्याचे डोळे.'

शेवटी शंकर व पार्वती त्या भिकंभटाजवळ आली, 'का रे ब्राह्मणा, का रडतोस? काय झाले? या रानात असा दुःखी कष्टी होऊन का बसलास?' शंकराने विचारले.

ब्राह्मण रडत म्हणाला, 'काय करू रडू नको तर? मला गरिबीने गांजले आहे. घरात बायको, चार मुलेबाळे आहेत; परंतु त्यांना खायला काय देऊ? आपल्या मुलांची उपासमार कोणाला बघवेल? शेवटी येथे रानात येऊन रडत बसलो.'

भगवान शंकर म्हणाले, 'आम्ही सुद्धा गरीबच आहोत; परंतु आमच्याजवळ तीन मडकी आहेत. त्यातील एक तुला देतो ते तू घे.'

भिकंभट म्हणाला, 'रिकामे मडके घेऊन काय करू? माझ्या घरात हांडे घंगाळे नसली तरी मातीची मडकी पुष्कळ आहेत; परंतु त्या मडक्यांत ठेवायला मात्र काही नाही. त्या मडक्यांत का दुःख भरू, डोळ्यांतील पाणी भरू?

शंकर म्हणाले, 'अरे, हे मडके असे तसे नाही. हे मंतरलेले मडके आहे. या मडक्यातून डाळेमुरमुरे बाहेर पडतात. 'पड पड' असे म्हटले की गरमागरम माल बाहेर पडतो. त्याचे दुकान घाल. लोक तुझ्या दुकानावरच येतील; कारण असा माल दुसरीकडे मिळणार नाही.'

भिकंभट आनंदला. आपल्यासमोर प्रत्यक्ष शंकर पार्वती आहेत हे त्याला माहीत नव्हते. नमस्कार करून व ते मडके घेऊन तो निघाला. वाटेत त्याला एक गाव लागले. तेथे तो थांबला. एका वाण्याच्या दुकानावर आपले मडके ठेवून म्हणाला, 'वाणीदादा वाणीदादा, मी नदीवरून आंघोळ करून येतो, तोपर्यंत माझे हे मडके सांभाळा.' वाणीदादा बरे म्हणाला, भिकंभट थोडेसे चालून गेल्यावर परत माघारी आला व त्या वाणीदादाला म्हणाला, 'वाणीदादा, खरोखरच सांभाळा बरे मडके. पोरेबाळे येतील, फोडतील बिडतील, हे मडके माझा प्राण आहे. हे मडके म्हणजे माझे सारे काही. मी येतोच चाली चाली स्नान करून.'

भिकंभट लगबगीने गेले. नदीवर पोचले व आंघोळ करू लागले. इकडे त्या वाण्याच्या मनात आले की हा ब्राह्मण एवढ्याशा मडक्याला इतका काय म्हणून जपतो. त्या मडक्यात काय आहे ते पाहाण्याचे त्याने ठरविले. त्याने मडक्यात डोकावून पाहिले तो काही दिसेना. ते मडके हलवावे असे त्याला वाटले. त्याने

ते हातात घेऊन सहज ‘पड पड’ असे म्हटले. तो काय आश्चर्य? आतून गरम गरम डाळेमुरमुरे यांची रास पडू लागली. त्याला आनंद झाला. त्याने आपल्या बायकोला हाक मारली व तो तिला म्हणाला, ‘हे बघ, हे मडके घरात ठेव व घरातील अगदी असेच एक मडके बाहेर आणून ठेव.’ बायकोने त्याप्रमाणे केले. वाणीदादा जणू काही झालेच नाही अशा साळसूदपणे तेथे बसला होता.

भिकंभट आंघोळ करून आले. ‘वाणीदादा, माझे मडके आहे ना रे?’ त्यांनी विचारले. वाणीदादा म्हणाला, ‘अहो मडक्याला कोण लावील हात? तो का सोन्याचा हंडा आहे की कोणी चोरील बिरील? ते आहे तेथे मडके. जा एकदाचे घेऊन.’

भिकंभट मडके घेऊन निघाले. मनात मनोराज्ये करीत ते चालत होते. मी आता श्रीमंत होईन. माड्या–महाल बांधीन, बागबगीचे करीन, असे मनात म्हणत चालले होते. रस्ता कसा संपला ते कळलेही नाही; गावची नदी आली तेव्हा आपले घर जवळ आले असे त्यांच्या ध्यानात आले. आले लगबगीने घरी. त्यांनी दारावर थाप मारली. सावित्रीबाईंनी दार उघडले तो दारात पतीची स्वारी!

‘आलेत ना परत! मी केलेच होते मुळी भाकित. एक दिवस जाल. दोन दिवस जाल. शेवटी हात हलवीत परत याल –’ सावित्रीबाई म्हणाल्या.

‘हात हलवीत परत आलो नाही. हे पहा मडके आणले आहे.’ भिकंभट म्हणाले.-

‘मडके आणले आहे! घरात का थोडी मडकी आहेत?’ सावित्रीबाई वेडावीत म्हणाल्या.

भिकंभट म्हणाले, ‘तुम्हा बायकांचा फारच उतावळा व अधीर स्वभाव. जरा नीट ऐकून तर घेशील की नाही? आलो नाही तो तुझी तोफ आपली सुरू. जरा धीराने घे.’

सावित्रीबाई उसळून म्हणाली, ‘आज दहा वर्षे तुमच्याबरोबर संसार केला तो का धीर असल्यावाचून? पोराबाळांना खायला देता येत नाही. थंडीवाऱ्याला अंगावर पांघरूण घालता येत नाही. तरी मी सारे मुकाट्याने बघते, सहन करते. म्हणे धीर नाही! लक्षात ठेवा, तुम्हा पुरुषांपेक्षा आम्ही बायकाच अधिक धीराच्या असतो, खंबीर असतो, सोशिक असतो. अगस्ती ऋषी सात समुद्र प्यायला.

आम्ही बायका अपमान, दुःख, कष्ट, हाल, अपेष्टा यांचे शेकडो समुद्र पीत असतो. म्हणे धीर नाही. धीर नसता तर केव्हाच जीव दिला असता!'

भिकंभट म्हणाले, 'कशी छान बोलतेस ? तू पुराणिकबाई का नाही होत ? माझे मुलाबाळांचे पोट तरी भरेल.'

सावित्रीबाई म्हणाली, 'घरचे पुराण संपून वेळ असेल तेव्हा की नाही ?'

भिकंभट म्हणाले, 'बरे, ते राहू दे. अग हे मडके आहे ना, ते मंतरलेले मडके आहे. याच्यातून डाळेमुरमुरे बाहेर पडतात. सारखी अखंड धार सुरू होते. आपण दुकान घालू. श्रीमंत होऊ. मग तुला सोन्यामोत्यांनी नुसती मढवीन.'

सावित्रीबाई हसून म्हणाली, 'मडक्यातून का कोठे डाळेमुरमुरे बाहेर पडतात ? वेड लागले तुम्हाला.'

भिकंभट म्हणाले, 'तुला प्रत्यक्षच दाखवतो. तू पोती आण भरायला.' असे म्हणून ते ते मडके हलवू लागले. 'पड पड' म्हणून हलवू लागले; परंतु एक दाणा पडेल तर शपथ!

'आता किती वेळ ते मडके हलवीत घुमणार ? ठेवा खाली. दमलेत, घामाघूम झालेत.' सावित्रीबाई रागातही हसून म्हणाली.

परंतु भिकंभट हसला नाही. त्या वाण्याने आपणास फसविले असे त्याला वाटले. ते मडके त्याने हातात घेऊन तो तसाच घराबाहेर पडला. सावित्रीबाई रडणाऱ्या मुलांना समजावीत बसली.

अंधारातून भिकंभट जात होता. उजाडते न उजाडते तोच तो वाणीदादाच्या घरासमोर दत्त म्हणून उभा राहिला. 'वाणीदादा, माझे मडके तुम्ही लांबवलेत. हे नव्हे माझे मडके. तुम्ही अदलाबदल केलीत. होय ना ? द्या माझे मडके.' असे तो ब्राह्मण म्हणाला.

वाणीदादा संतापून भिकंभटाच्या अंगावर धावून गेला. तो रागाने म्हणाला, 'मला काय करायचे तुझे मडके ? मला का भीक लागली आहे ? मी का चोर आहे ? नीघ येथून. नाहीतर थोबाड रंगवीन. नीघ.'

ती बाचाबाची ऐकून शेजारची मंडळीही तेथे आली. त्या सर्वांनी भिकंभटाची हुर्यो केली. त्याला हाकलून लावले. बिचारा भिकंभट पुन्हा रडत निघाला. रानात जाऊन त्या पूर्वीच्याच झाडाखाली रडत बसला.

तिकडून शंकर पार्वती जात होती. त्याचे रडणे त्यांच्या कानी पडले. पार्वती शंकरास म्हणाली, 'देवा, कोणी तरी दुःखीकष्टी प्राणी रडत आहे. चला. आपण पाहू.' शंकर म्हणाले, 'पुरे झाले तुझे. या जगाला रडण्याशिवाय धंदा नाही व तुला त्याचे रडणे थांबविण्याशिवाय धंदा नाही. या रडारडीला मी तरी कंटाळलो आता आणि आपल्याजवळ तरी असे काय उरले आहे?' पार्वती म्हणाली, 'अजून दोन मडकी शिल्लक आहेत. तोपर्यंत काय द्यायचे ही चिंता नको. चला जाऊ त्या दुःखी प्राण्याकडे.'

ती त्या झाडापाशी आली. तो तोच पूर्वीचा ब्राह्मण. शंकरांनी विचारले, 'का रडतोस, काय झाले?'भिकंभट म्हणाला, 'काय सांगू महाराज? त्या एका वाणीदादाकडे मी मडके ठेवून आंघोळीला गेलो. आंघोळ केल्यावर मडके घेऊन घरी गेलो. 'पड पड' म्हणून मडके हलविले; परंतु एक दाणा पडेल तर शपथ. त्या वाण्याने मडके बदलले असावे अशी शंका येऊन मी त्याच्याकडे गेलो. त्याला विचारले; परंतु तो माझ्या अंगावर धावून आला. शेजारीपाजारी त्याच्याच बाजूचे. खऱ्याची दुनिया नाही. मी गरीब, एकटा पडलो. आलो पुन्हा या झाडाखाली व बसलो रडत.'

भगवान शंकर म्हणाले, 'हे दुसरे मडके घे.'

भिकंभटाने विचारले, 'यातून काय बाहेर पडते?'

शंकर म्हणाले, 'यातून 'पड पड' म्हटले की राक्षस बाहेर पडतात. 'शिव शिव' म्हटले की ते नाहीसे होतात. घे हे मडके व त्या वाण्याची खोड मोड.'ब्राह्मणाच्या सारे ध्यानात आले. नमस्कार करून व ते मडके घेऊन ब्राह्मण निघाला. तो त्या वाण्याकडे आला व म्हणाला, 'वाणीदादा, वाणीदादा, सापडले हो माझे मडके. उगीच तुमच्यावर आळ घेतला. झाले गेले विसरून जा. हे माझे मडके सांभाळा. मी नदीवरून आंघोळ करून येतो. सांभाळा हां.'

ब्राह्मण नदीवर गेला. त्या मडक्यात काय असावे हे पाहाण्याच्या निमित्ताने वाणीदादा उठला. त्याने ते मडके हलविले, 'पड पड' म्हटले तो एकदम अक्राळविक्राळ राक्षस बाहेर पडले. त्यांच्या हातांत सोटे होते. गदा होत्या, त्या वाण्याला ते राक्षस बदडू लागले. वाणीदादा ओरडू लागला. त्याच्या आरोळ्या ऐकून शेजारीपाजारी धावले. त्यांनाही राक्षसांनी भरपूर प्रसाद दिला.



'मेलो, मेलो, ब्राह्मणा धाव! असे सारे ओरडू लागले. पाठीवर तडाखे बसत होते. सारे चांगले झोडपले गेले. भिकंभट सावकाश येत होता.

'अरे ब्राह्मणा, हे राक्षस आम्हाला जिवंत ठेवणार नाहीत असे दिसते. सांग यांना काही. वाचव आमचे प्राण –' सारे गयावया करीत म्हणू लागले.

भिकंभट वाणीदादाला म्हणाला, 'वाणीदादा, माझे पहिले मडके मुकाट्याने दे. तरच हे राक्षस नाहीसे होतील.'

वाणीदादाची तर कणीक चांगलीच तिंबली गेली होती. तो पटकन घरात गेला व ते मडके घेऊन बाहेर आला. ब्राह्मणाने ते मडके घेतले व नंतर 'शिव शिव' 'शिव शिव' असे म्हणताच ते राक्षस अदृश्य झाले.

भिकंभट आता ती दोन मडकी हातात घेऊन निघाले. केव्हा एकदा घरी जाऊ असे त्यांना झाले होते. आले एकदाचे घर. दोन हातांत दोन मडकी घेऊन आलेल्या आपल्या नवऱ्याचा तो अवतार पाहून सावित्रीबाईंना हसू आले. भिकंभट म्हणाले, 'हसू नको, पोती आण. डाळेमुरमुऱ्यांनी भरून देतो.' 'पड पड.' असे म्हणत मडके हलवू लागले. काय आश्चर्य! डाळेमुरमुऱ्यांची धार लागली. पोराबाळांना आनंद झाला. मुठी भरभरून ती खाऊ लागली. भिकंभट बायकोला म्हणाले, 'तू सुद्धा खाऊन बघ. अमृतासारखी चव आहे.' तिने दोन दाणे तोंडात टाकले व मग ती म्हणाली, 'खरेच हो, डाळेमुरमुरे असे कोठेही कधी खाल्ले नाहीत.'

भिकंभटाने भडभुंजाचे दुकान थाटले. जो तो त्याच्या दुकानावरून माल नेऊ लागला. त्याच्या दुकानावर ही गर्दी. भिकंभट श्रीमंत होऊ लागला. तो शेतीवाडी विकत घेऊ लागला. सावकारी करू लागला. त्याने बायकोला, मुलाबाळांना दागदागिने केले. कशाला आता जणू तोटा नव्हता.

एके दिवशी भिकंभट खेड्यावर गेले होते. आज मडके कोण हलविणार? त्यांच्या मुलांत भांडण सुरू झाले. एक म्हणे मी हलवीन, दुसरा म्हणे मी हलवीन. झोंबाझोंबी सुरू झाली. शेवटी ते मडके जमिनीवर पडले व त्याचे झाले तुकडे. ती मुले रडू लागली. तिकडून आई आली व तिनेही त्यांना मार मार मारले, 'मस्ती आली होती मेल्यांना, खाल काय आता भुरी?' असे ती ओरडली.

भिकंभट घरी आले. त्यांना सर्व प्रकार कळला. सावित्रीबाई म्हणाली, 'पुन्हा एकदा बसा ना झाडाखाली त्या रडत. मिळाले एखादे मडके तर बरे झाले. नाही मिळाले तर हे दागदागिने मोडू व पोटाला खाऊ.'

बायकोचा हा पोक्त सल्ला भिकंभटाने ऐकला. तो पुन्हा निघाला व त्या झाडाखाली रानात रडत बसला. तिकडून शंकर पार्वती जात होती. 'देवा, कोणी तरी रडते आहे, चला आपण पाहू.' शंकर म्हणाले, 'शेवटचे मडके आज देऊन टाकू. पुन्हा कोणाकडे जायला नको. कोण रडतो पाहायला नको.' ती दोघे त्या झाडाजवळ आली तो तोच ब्राह्मण,

'काय रे ब्राह्मणा, आता काय झाले?'

‘मुलांच्या भांडणात मडके फुटले, मी फुटक्याच नशिबाचा जणू आहे. काय करू महाराज?’

शंकर म्हणाले, ‘आता हे शेवटचे मडके देतो. पुन्हा रडत येऊ नकोस. आलास तरी उपयोग नाही.’

भिकंभटाने विचारले, ‘या मडक्यातून काय बाहेर पडते?’

भगवान म्हणाले, ‘पाहिजे असेल ते पक्वान्न हवे असेल तितके बाहेर पडते.’

भिकंभट आनंदला. नमस्कार करून ते तिसरे मडके घेऊन घरी आला. बायको वाटच पाहात होती. नवीन मडके पाहून तिलाही आनंद झाला.

‘यातून काय पडते बाहेर?’ तिने विचारले.

‘पातेले घेऊन ये.’ तो म्हणाला.

सावित्रीबाई पातेले घेऊन आल्या. भिकंभटाने मडके हलवून ‘श्रीखंड’ असे म्हटले. तो काय आश्चर्य! घट्ट सुंदर पिवळे धमक श्रीखंड पडू लागले. मुलाबाळांनी, सर्वांनी पोटभर खाल्ले.

भिकंभटाने आता हलवायाचे दुकान घातले. पेढे, बर्फी, श्रीखंड, बासुंदी, पुरी, जिलबी, लाडू, रसगुल्ले सारे पदार्थ तेथे असत. सारी दुनिया त्याच्याकडून माल घेई. सणवार आला की भिकंभटाच्या दुकानावर गर्दी असायची. भिकभटाकडे माल मिळतो तसा कोठेही मिळत नाही अशी दुकानाची कीर्ती पसरली.

त्या गावात धनमल म्हणून एक श्रीमंत मनुष्य होता. तो कारस्थानी होता. युक्तिबाज होता. भिकंभटाकडील या श्रीखंडबासुंदीच्या मडक्याची गोष्ट त्याच्या कानावर आली. भटजीकडील हे मडके लांबविण्याचा त्याने विचार केला.

एकदा काय झाले, त्याचा जावई आला. बऱ्याच दिवसांनी आलेल्या जावईबोवांस थाटाची मेजवानी द्यावी असे धनमल याला वाटले. सर्व तयारी झाली. धनमल भिकंभटाकडे जाऊन म्हणाला. ‘जावयाला पंगत आहे. तुम्ही उत्कृष्ट पक्वान्ने पुरवाल काय?’ भिकंभट म्हणाला, ‘हो.’ त्यावर पुन्हा धनमल म्हणाला, ‘ताजा ताजा माल तेथल्या तेथे मिळावा म्हणून तुम्ही आमच्याकडे या व पक्वान्नांचा पुरवठा करा.’ भिकंभट म्हणाला, ‘एका अटीवर मी तुमच्या घरी येईन. मला स्वतंत्र खोली दिली पाहिजे. खोलीत कोणी येता कामा नये.

मी आतून पातेली, पराती भरभरून देत जाईन.' धनमल म्हणाला, 'ठीक. तशी व्यवस्था करू.'

मेजवानीचा दिवस उजाडला. गावातील मोठमोठ्यांस आमंत्रण देण्यात आले. जेवणाची तयारी झाली, कण्यारांगोळ्या घालण्यात आल्या. चंदनाचे पाट मांडले गेले. सुंदर केळीची पाने होती. जावयासाठी सुंदर असे चांदीचे ताट होते, अगरबत्त्यांचा घमघमाट सुटला होता.

अगदी आयत्या वेळेस भिकंभट फडक्यात मडके गुंडाळून घेऊन धनमलच्या घरी आला. त्याला खोली दाखविण्यात आली. तो त्या खोलीत गेला. भरपूर माल पाच मिनिटांत त्याने दिला. बाहेर पंगत बसली. मंडळी जेवू लागली.

धनमलने काय केले, वाढायला भरपूर पक्वाने आहेत असे पाहून ज्या खोलीत ब्राह्मण होता तिला एकदम त्याने बाहेरून कडी लावून घेतली. ब्राह्मण ओरडू लागला, मला शौचास जावयाचे आहे. मला लघवीस जावयाचे आहे, दार उघडा. असे ओरडू लागला. कोणी दार उघडीना.

धनमल येऊन म्हणाला, 'भटजीमहाराज, आता खोलीतच मरा. मडक्यातील पक्वान्न खा. पाणी मिळणार नाही. बाहेर पडता येणार नाही. जर खोलीतून बाहेर पडायचे असेल तर ते मडके मला दिले पाहिजे.'

काय करणार भिकंभट ? मडके द्यावयास तो तयार झाला. धनमलने मडके घेऊन त्याला दार उघडले. ब्राह्मण रडत घरी गेला. इकडे जेवणे चालली होती. धनमल पंगतीत जाऊन म्हणाला, 'स्वस्थ होऊ दे भोजन. आता आणखी दुसरी पक्वान्ने लवकरच येतील.' त्या मडक्यातून तऱ्हेतऱ्हेची ताजी ताजी पक्वान्ने बाहेर पाडण्यात येऊ लागली. मंडळी संतुष्ट होत होती.

इतक्यात भिकंभट ते राक्षसाचे मडके घेऊन धनमलकडे आला. ते मडके इतके दिवस माळ्यावर नीट ठेवण्यात आले होते. ब्राह्मण धनमलला म्हणाला, 'एक मडके घेतलेस, आता हेही घे. यातून तर अधिकच सुंदर पदार्थ बाहेर पडतात. घ्या हे. मला काही नको.'

धनमल म्हणाला, 'आण इकडे. नको तर नको.' ब्राह्मण मडके देऊन निघून गेला. धनमल पुन्हा पंक्तीत जाऊन म्हणाला, 'स्वस्थ जेवा. आता आणखी निराळेच पदार्थ येणार आहेत. हे पदार्थ कधी बाधणार नाहीत. खायला संकोच नका करू.'

धनमलने ते नवीन मडके हलवले. तो काय! त्यातून सोटे घेतलेले राक्षस बाहेर पडले. ते भयंकर राक्षस सर्वांना बदडीत सुटले. जावईबोवांच्या पाठीत चांगलाच तडाखा बसला. सासरे धनमल तर ओरडू लागले, 'मेलो मेलो' म्हणू लागले. सर्वांची त्रेधातिरपीट. पोटे फार भरलेली म्हणून न पटकन उठता येई न पळता येई. नेसूचे सावरणेही मुष्कील झाले.

'अरे त्या ब्राह्मणाला बोलवा. त्याला बोलवा' असे धनमल सांगू लागला. कोणी तरी ब्राह्मणाला सारे जाऊन सांगितले. ब्राह्मण तेथे आला. तो धनमल यास म्हणाला, 'माझे पहिले मडके दे म्हणजे राक्षस नाहीसे करतो.' ते पहिले मडके देण्यात आले. भिकंभटाने 'शिव शिव शिव शिव' असे म्हटले. तात्काळ राक्षस अदृश्य झाले. सर्वांचे जीव खाली पडले.

भिकंभट दोन्ही मडकी घेऊन घरी आला. पुनश्च त्याच्या वाटेला कोणी गेले नाही. भिकंभट, सावित्रीबाई, त्यांची मुलेबाळे सारी सुखात राहिली.

संपली आमची कथा
सरो ऐकणाराची व्यथा

* * *





खरा मित्र : कथा तिसरी

# न्याय देणारा गुराखी



एका गावात एक ब्राह्मण होता. त्याची बायको होती. त्याला पाचसहा मुले होती. प्रपंच मोठा परंतु घरात एक पै असेल तर शपथ. घरात नको काय? संसार मांडला की सारे त्रिभुवन हवे. कपडालत्ता हवा, खायला प्यायला हवे, दवापाणी हवे; परंतु त्रिंबकभटजीच्या घरात सर्वच गोष्टींची टंचाई. त्याची बायको रमाबाई दिवसभर खपे. कोणाची धुणी धुवी, कोणाकडे दळायला जाई; परंतु तेवढ्याने एवढे मोठे घर कसे चालणार?

एके दिवशी रमाबाई फारच रागावली होती. त्रिंबकभट ओटीवर बसला होता. ती तणतणत बाहेर आली व म्हणाली, 'नुसते गुळाचे गणपती बसा तेथे. काही लाज कशी ती मुळी नाही. त्या चिंत्याची मुंज करायला हवी, नमीला स्थळ पाहायला हवं; परंतु तुम्हाला त्याचे काही तरी आहे का? एवढे पुरुषासारखे पुरुष परंतु खुशाल ऐदीनारायण तेथे बसून राहाता. जणू शेणाचा पो. शेणाच्या पोचाही उपयोग होतो; परंतु तुमचा काडीचाही उपयोग नाही. खायला काळ व भुईला भार!'

रमाबाईंचे तोंड सारखे चालले होते. त्रिंबकभटाला फारच लागले ते बोलणे. त्याने कोठे तरी दूरदूर निघून जावयाचे ठरविले. तो बायकोला म्हणाला, 'आजपर्यंत मी पुष्कळ सहन केले, लोकसुद्धा बोलणार नाहीत इतके तू रोज बोलतेस; परंतु आज कमाल केलीस. आज घरातून मी जातो. चारपाच हजार रुपये जमवीन तेव्हाच तुला तोंड दाखवीन. समजलीस ना?'

वैतागाने ब्राह्मण खरोखरच निघून गेला. शेजारच्या बायका रमाबाईस म्हणाल्या, 'आता आणतील हो थैल्या भरून. आता तुम्हाला तोटा पडणार

नाही. सोन्याने तुम्हाला मढवून काढतील.' रमाबाई म्हणाली, 'अहो, कसले आणतात पैसे! उद्या स्वारी घरी परत येईल. अगदी कसे ते साहस नाही. चार ठिकाणी जावे, काही उद्योग पाहावा. ते काही नाही. गेल्या आल्याशिवाय का काही होते? परंतु यांना घर सोडायला नको. उद्या हात हलवीत परत येतील.'

त्रिंबकभटजीच्या परसावात एक फार जुने झाड होते. त्याचा विस्तार मोठा होता. त्या झाडावर एक भूत राहात असे. उंच विशाल अशी जुनी झाडे भुतांना राहावयास आवडतात. त्या भुताने ठरविले की आपण त्रिंबकभटजी व्हायचे. त्याने त्रिंबकभटजीचे रूप हुबेहूब धारण केले. तसेच रूप, तसेच बोलणेचालणे, तसाच पंचा, तशीच ती बंडी व तसेच ते मोठे पागोटे. त्रिंबकभटजी उजाडत अंगणात उभे. रमाबाई सडा सारवण्यासाठी बाहेर आली तो नवरा दृष्टीस पडला. तिचे तोंड सुरू झाले. 'आलेत ना परत? जाल कोठे मसणात? तेथे ओटीवर फतकल मारून बसायची झाली आहे सवय. हं. या घरात. तेथे खांबासारखे उभे नको राहायला.' परंतु ते भूत म्हणाले, 'अग, घरी आलो परंतु हात हलवीत नाही आलो. मंत्र शिकून आलो. ऋद्धिसिद्धीचा मंत्र. तुला हवे असेल ते मी आता देईन. बोल काय हवे?'

रमाबाई म्हणाली, 'द्या पाचशे रुपये.'

भुताने सांगितले, 'डोळे मीट.'

रमाबाईने डोळे मिटले. भुताने सांगितले, 'उघड डोळे.' तिने डोळे उघडले. खरोखरच तिथे पाचशे रुपयांची थैली. तिने ती थैली एकदम उचलली व घरात कुलपात ठेवली. तिला खूप आनंद झाला. ती आता नवऱ्याजवळ गोड बोलू लागली, गोड हसू लागली. पैशाने सारे प्रसन्न होतात.

आता रमाबाईला कसलीही वाण पडत नसे. वस्तूची इच्छा होण्याचा अवकाश की वस्तू आपली हजर. त्या दागदागिने घालून देवळात जात. मुलेबाळे सजवीत नटवीत. घरात कामाला आता गडीमाणसे ठेवण्यात आली. रमाबाई सुखी झाली. लोक म्हणत, 'त्रिंबकभटाला कोणता देव पावला काही कळत नाही. परीस सापडला असावा, चिंतामणी मिळाला असावा का कल्पवृक्षाची कृपा झाली?'

त्रिंबकभटजीकडे आता अड्डा जमे. तेथे पानसुपारीचे तबक भरलेले असे. सुंदर तपकीर असे. गाणेबजावणेही चाले. रमाबाईचे घर नेहमी गजबजलेले असे.

एके दिवशी शेजारचे लखूभटजी म्हणाले, 'त्रिंबकभटजी, तुम्हाला आता त्रिंबकराव म्हटले पाहिजे. तुम्ही आता भिक्षुकी करीत नाही. करण्याची जरूरीही नाही. तुम्ही आता गृहस्थ बनलेत.' परंतु ते भूत म्हणाले, 'आपले पूर्वीपासून नाव चालत आले तेच खरे. पैसा दोन दिवसाचा. आज आहे उद्या नाही. मला भटजी नावाचा अपमान नाही वाटत, त्रिंबकभट असे म्हणवून घेण्यातच मला अभिमान वाटतो.'

असे दिवस चालले. कित्येक वर्षे गेली. ते भूत त्रिंबकभटजी म्हणून वावरत होते. नमीचे लग्न झाले. चिंतूची मुंज झाली. घरात आणखीही दोन मुलांची भर पडली. त्रिंबकभटाचा वाढता संसार आणखी वाढत होता. भरल्या गोकुळासारखे घर शोभत होते.

आणि तो खरा त्रिंबकभट? कोठे गेला तो, काय झाले त्याचे? तो पुष्कळ दूरदूर गेला. त्याने अनेक उद्योग केले. दहाबारा वर्षे त्याने अपार कष्ट काढले. हळुहळू त्याने जवळ चांगली पुंजी जमविली. आता घरी जावे, मुलेबाळे मोठी झाली असतील त्यांना भेटावे असे त्याच्या मनात आले. त्याने बायकोसाठी सुंदर लुगडी खरेदी केली. मुलांसाठी नाना प्रकारच्या जिनसा त्याने विकत घेतल्या आणि तो निघाला. मनात मनोराज्ये करीत जात होता. आता आयुष्याची शेवटची वर्षे तरी सुखाने जातील, बायको बोलणार नाही, अपमान करणार नाही, सेवाशुश्रूषा करील वगैरे विचार त्याच्या मनात चालले होते.

किती तरी वर्षांनी त्रिंबकभट आपल्या घरी आला. अंगणातून तो ओसरीवर आला; परंतु ओसरीवर ते भूत होते. ते भूत विचारू लागले, 'कोण पाहिजे तुम्हाला? आत कोठे चाललेत?'

त्रिंबकभटजी म्हणाला, 'तुम्ही कोण? मी माझ्या घरी आलो आहे.'

भूत म्हणाले, 'अहो मी त्रिंबकभट. या माझ्या घरात आज पन्नास वर्षे मी नांदतो आहे. मुलेबाळे झाली. संसार झाला. तुम्हाला भ्रम तर नाही झाला?'

दमूनभागून आलेला, आशेने आलेला त्रिंबकभट संतापला. तो शिव्या देऊ लागला. रमाबाई बाहेर आली. मुलेबाळे बाहेर आली. गडीमाणसे धावून आली. शेजारीपाजारी आले.

'अग, मला नाही का तू ओळखीत? मी तुझा नवरा नाही का? काय रे पोरांनो, बापाला ओळखता की नाही? हसता काय? हे माझे घर, ही

माझी बायको, ही माझी मुले! लखंभट, तुम्हीही नाही का ओळखीत मला?' त्रिंबकभट विचारू लागला.

'अहो, हे आमचे त्रिंबकभट या घरातून बाहेर गेलेले आम्हाला आठवत नाहीत. तुम्हाला वेड लागले असावे. भुताने झपाटले असावे. निघा येथून. चावटपणाने बोलतो. म्हणे, तू माझी बायको, मी तुझा नवरा. नीघ येथून. घालवा रे याला.' लखंभट म्हणाले.

त्या खऱ्या त्रिंबकभटाला सर्वांनी हात धरून बाहेर ओढले. तो रडत रडत निघाला. ज्यांच्या सुखासाठी तो बारा वर्षे देशान्तरी गेला, त्यांनीच त्याला घालविले. मुले त्याला बाप म्हणत ना, बायको पती म्हणून ओळखीना. त्याने बायकोसाठी लुगडी आणली होती, मुलांसाठी किती वस्तू आणल्या होत्या; परंतु काय करायचे आता त्यांचे? त्रिंबकभटजीच्या डोळ्यांतून पाणी गळत होते.

शेवटी त्याने राजाकडे फिर्याद केली. राजासमोर खटला चालायचा असे ठरले. न्यायमंदिरात अलोट गर्दी झाली. दोन्ही त्रिंबकभट राजासमोर उभे राहिले.

एक म्हणे, 'मी त्रिंबकभट, हा लफंग्या आहे.'

दुसरा म्हणे, 'मी खरा त्रिंबकभट, हा चोर आहे.'

शेजारी म्हणत, 'त्रिंबकभट घरातून कधी गेला नाही. आज पन्नास वर्षे त्याला आम्ही पाहात आहोत.'

काय निकाल द्यावा ते राजास कळेना. त्याची बुद्धी चालेना. शेवटी तो खऱ्या त्रिंबकभटजीस म्हणाला, 'तुमचा निकाल मला लावता येत नाही. हा त्रिंबकभट इतकी वर्षे येथे आहे. शेजारीपाजारी सांगत आहेत. तुम्ही तर काल आलेत. तुम्ही खरे कशावरून? सारे लोक का खोटे? लबाड दिसता; परंतु मी शिक्षा करीत नाही. कदाचित तुम्ही भ्रमिष्ट झाला असाल, कोणी भुताबिताने झपाटले असेल. निघा येथून.'

तो खरा त्रिंबकभट रडत रडत रानात गेला. कपाळाला हात लावून बसला. म्हातारपणी मला कोणी नाही असे मनात येऊन त्याला पुन:पुन्हा हुंदके येत. त्या रानात गुराखी गाई चारीत होते. एकीकडे गाई चरत होत्या, दुसरीकडे गुराखी खेळ खेळत होते. आज ते 'राजा व प्रजा' हा खेळ खेळत होते. एक गुराखी राजा झाला होता. काही राजाचे शिपाई झाले. काही प्रजा बनले. राजा झालेला गुराखी शिपायांस म्हणाला, 'या रानाचा मी राजा. या रानात

कोणी दुःखी कष्टी नाही ना, कोणावर अन्याय झाला नाही ना? जा, सर्वत्र बघा. अन्याय झाला असेल तर तो मी दूर करीन. कोणाला दुःख असेल तर ते दूर करीन. जा. सर्वत्र पाहून या.'

ते शिपाई झालेले गुराखी निघाले. इतक्यात झाडाखाली रडत बसलेला तो म्हातारा त्यांना दिसला. ते सारे धावत तेथे आले. त्यांचा नायक त्रिंबकभटास म्हणाला, 'म्हातारे बाबा, का रडता? कोणता अन्याय आहे? कोणते दुःख आहे? आमच्या राजेसाहेबांकडे चला. ते अन्याय दूर करतील. दुःख नाहीसे करतील. उठा.' म्हातारा उठेना. तो आणखीच रडू लागला. ती मुले म्हणाली, 'उठतोस की नाही? राजाचा हुकूम आहे. तो पाहा आमचा राजा. ऊठ. चल त्याच्याकडे. या काठ्या पाहिल्यास ना हातातल्या? ऊठ. बऱ्या बोलाने चल.'

म्हातारा म्हणाला, 'का छळता गरिबाला? मी दुर्दैवी आहे. या जगात मला कोणी नाही. या जगात सारा अन्याय आहे. रडू दे मला.'

मुले म्हणाली, 'आमच्या राज्यात कोणी रडता कामा नये. उठा, चला. आमचा राजा न्याय देईल. खोटेनाटे दूर करील. उठा म्हातारे बाबा. नाही तर ओढीत न्यावे लागेल बघा.'

तो म्हातारा उठला. त्या गुराखी शिपायांनी त्याला आपल्या राजासमोर उभे केले.

'काय म्हातारबाबा, काय आहे हकीगत? कोणते आहे दुःख, कोणता झाला अन्याय?' त्या राजा झालेल्या गुराख्याने विचारले. म्हातारा काही बोलेना, काही सांगेना. ते शिपाई झालेले गुराखी काठ्या उगारून म्हणाले, 'सांग सारी हकीगत. सांगतोस की नाही? राजाचा अपमान करतोस?

म्हाताऱ्याने सारी हकीगत सांगितली. गुराखी हसू लागले. परंतु त्यांचा राजा म्हणाला, 'हसू नका. मी राजा येथे न्याय देण्यासाठी बसलो असता हसता कसे? पुन्हा हसाल तर शिक्षा होईल. हं, मग काय म्हातारेबाबा, राजानेही तुम्हाला न्याय दिला नाही. अरेरे! मी असतो तर तुम्हाला न्याय दिला असता. तुमचे घरदार, तुमची मुलेबाळे, तुमची बायको तुम्हाला परत दिली असती. जा, त्या खऱ्या राजाला जाऊन सांगा की रामा गोवारी - गुराख्यांच्या खेळातील राजा - योग्य न्याय देण्यास तयार आहे. जा, सांगाल की नाही?'

'कसे सांगू? मला तेथून हाकलून देतील. मारतील. तुरुंगात घालतील. म्हणतील, वेडा आहे. म्हणतील म्हातारचळ लागला याला. येथेच रडू दे.' त्रिंबकभट रडत म्हणाला.

'तुला जाऊन सांगितले पाहिजे. आमच्या राजाचा हुकूम पाळला पाहिजे. सांगतोस की नाही जाऊन? बोल, नाही तर या काठ्या आहेत बघ.' ते शिपाई झालेले गुराखी म्हणाले.

'सांगतो जाऊन.' त्रिंबकभट म्हणाला.

त्रिंबकभट खऱ्या राजाकडे जावयास निघाला. त्याच्या मनात एक विचार आला की एखादे वेळेस मोठ्यामोठ्यांना जे प्रश्न सुटत नाहीत ते प्रश्न एखादा लहान मुलगाही सहज सोडवतो. मोठमोठ्यांची बुद्धीही जेथे गुंग होते, तेथे लहान अडाणी बालकही बुद्धी चालवतो. राजाला निकाल देता आला नाही. कदाचित् हा गुराख्याचा पोर देईल.

त्रिंबकभट राजाकडे आला. त्याची तेथे दाद लागेना; परंतु शेवटी एका भल्या माणसाने त्याला राजाकडे नेले. राजा म्हणाला, 'पुन्हा कशाला आलास म्हाताऱ्या? तुमचा खटला आम्हाला चालवता येत नाही. दोघे सारखे दिसता. काय द्यावा न्याय?' त्रिंबकभट म्हणाला, 'राजा, रानात मी रडत होतो. तेथे गुराखी लोक खेळत होते राजाराजाचा खेळ. रामा गोवारी राजा झाला. इतर शिपाई झाले. त्या शिपायांनी मला त्यांच्या खेळातल्या राजाकडे नेले. तो रामा गोवारी मला म्हणाला, 'सांग तुझे दुःख.' मी सारी हकीगत सांगितली. तेव्हा रामा गोवारी म्हणाला, 'हा तर साधा खटला आहे. मी योग्य तो निकाल देईन. जा, राजाला सांग. तुमच्या खऱ्या राजाला सांग की तुला नसेल न्याय देता येत तर रामा गोवारी देईल.' महाराज, आपला अपमान करण्याचा माझा हेतू नाही; परंतु कधी कधी पोरांची बुद्धी थोरांना लाजविते. आपण प्रयोग करून पाहावा. त्या गोवाऱ्याला बोलावून विचारावे. जर त्याने हा प्रश्न सोडविला तर मी सुखी होईन. माझ्या मुलाबाळांत परत जाईन. ऐका एवढे महाराज.'

राजाने प्रयोग करून पाहावा असे ठरविले. दुसऱ्या दिवशी न्यायमंदिरात कोण गर्दी? ती बातमी सर्वत्र पसरली. गुराखी न्याय देणार, रामा गुराखी न्यायासनावर बसणार. सर्वांना आश्चर्य वाटत होते. त्या रामा गोवाऱ्याला बोलावण्यात आले. त्याच्याबरोबर त्याचे इतर गुराखी सवंगडीही आले होते.

रामा गोवारी येताच राजा उभा राहिला, सारे अधिकारी उभे राहिले, सारे लोक उभे राहिले. जणू कोणी राजाधिराजच आला!

राजा म्हणाला, 'आज रामा गोवारी न्यायासनावर बसणार आहे. या रे त्याच्या मित्रांनो, असे त्याच्याभोवती शिपायांप्रमाणे उभे राहा.'

रामा गोवारी न्यायासनावर बसला. भोवती इतर गुराखी खांद्यावर घोंगडी, हातात काठी असे उभे राहिले. राजा, त्याचे प्रधान, त्याचे अधिकारी बाजूला बसले होते. खटल्यास सुरुवात झाली.

'कोठे आहेत ते दोन्ही त्रिंबकभट? त्यांना समोर उभे करा.' रामा गोवारी म्हणाला.

खरा त्रिंबकभट व खोटा त्रिंबकभट दोघे समोर उभे करण्यात आले. खोटा त्रिंबकभट हसत होता. खरा रडत होता. लोकांना आता काय होते हे पाहाण्याची उत्सुकता होती.

'दोन बाटल्या आणा बघू येथे. शिपाई, कोण आहे तेथे? बाटल्या आणा.' रामा गोवारी म्हणाला.

तेथे दोन बाटल्या आणण्यात आल्या.

रामा गोवारी त्या दोन्ही त्रिंबकभटांस उद्देशून म्हणाला, 'तू म्हणतोस मी त्रिंबकभट, तू म्हणतोस मी त्रिंबकभट. तू म्हणतोस की हे घरदार, ही मुलेबाळे, ही बायको – सारे माझे आणि तूही तसेच म्हणतोस. ठीक. हे पाहा. या येथे दोन बाटल्या आहेत. जो खरा त्रिंबकभट असेल तो या बाटलीत शिरून दाखवील. पाहू या कोण शिरून दाखवतो. हं आटपा, जलदी करा.'

लोकांची उत्कंठा वाढत होती. काय होते इकडे सर्वांचे डोळे होते. खरा त्रिंबकभट म्हणाला, 'बाटलीत कसे येईल शिरता?' परंतु खोटा म्हणाला, 'मी शिरून दाखवतो.' आणि खरोखरच एकदम लहान होऊन तो त्या बाटलीत शिरला. तो बाटलीत शिरताच रामा गोवाऱ्याने वरती एकदम बूच बसविले, लोक आश्चर्यचकित झाले.

रामा गोवारी उभा राहिला व म्हणाला, 'मिळाला ना न्याय? बाटलीत शिरलेला त्रिंबकभट म्हणजे भूत होते. भुतांना लहान मोठे होता येते. हे भूत त्रिंबकभट म्हणून इतकी वर्षे वावरत होते आणि हा खरा त्रिंबकभट येथे उभा आहे.'



हजारो लोकांनी टाळ्या वाजविल्या. राजा, त्याचे प्रधान व इतर अधिकारी चकित झाले. राजा उभा राहून रामा गोवाऱ्यास म्हणाला, 'शाबास तुझी. मी तुझ्यावर प्रसन्न झालो आहे. काय वाटेल ते माग, मी देतो.' रामा गोवारी म्हणाला, 'मला जहागीर नको, इनाम गाव नको. गाईगुरांना गायराने मोफत असू देत. गाईंच्या कासा भरदार असू देत. दुधाचा सुकाळ होऊ दे. लोक धष्टपुष्ट होऊ देत. राजा, गुराख्याची दुसरी इच्छा काय असणार?'

राजा गोवारी व त्याचे मित्र रानात खेळायला निघून गेले. लोक घरोघर गेले. त्रिंबकभटजी आपल्या घरी आला. मुलेंबाळे त्याला भेटली. बायकोचे डोळे भरून आले. सारी सुखी झाली. ती सुखी झाली तशी तुम्ही सारी व्हा.'

**'गोष्ट झाली अशी**
**सांगा आहे कशी**
**सारी राजीखुशी.'**





खरा मित्र : कथा चौथी

# गोसावी



एक होता राजा. त्याला सर्व प्रकारचे सुख होते. त्याला कसली वाण नव्हती. एकच दुःख होते व ते म्हणजे त्याला मूलबाळ नव्हते. राजा व राणी यामुळे नेहमी खिन्न व दुःखी असत. राणीने पुष्कळ उपासतापास केले, व्रतवैकल्ये केली; परंतु तिची इच्छा पुरी होईना. राजवाडा संपत्तीने भरलेला होता. दारी हत्ती झुलत होते. घोडे होते, रथ होते. दासदासींना तोटा नव्हता; परंतु मूल नव्हते. त्यामुळे सारे असून नसून सारखे असे राणीस वाटे.

एके दिवशी कोणी एक भिक्षेकरी गोसावी आला. त्याच्या अंगाला भस्म लावलेले होते. गळ्यात रुद्राक्षांच्या माळा होत्या. डोक्यावर मोठमोठ्या जटा होत्या. त्याला पाहून लहान मुले भिऊन पळू लागली. भिक्षा मागतामागता तो राणीच्या अंगणात आला. राणी दुःखी कष्टी होती. तो यती राणीला म्हणाला, 'तुम्ही दुःखी का ? तुमचे राज्य मोठे, तुमची संपत्ती अगणित; मग तुम्हाला दुःख का ?' राणी म्हणाली, 'जगात एक पुत्ररत्न खरे, बाकीची रत्ने काय कामाची ? पोटी संतान नाही, म्हणून जीव दुःखी आहे. माझ्या मनास चैन पडत नाही. खाणेपिणे सुचत नाही.' तो गोसावी म्हणाला, 'मी तुम्हाला दोन पुत्र देतो. परंतु माझी एक अट आहे. तुम्हाला जर दोन मुलगे झाले, तर त्यांतील एक तुम्ही मला द्यावा. मी बारा वर्षांपर्यंत केव्हाही येईन. जर बारा वर्षांत आलो नाही तर दोन्ही मुलगे तुमचे.' राणीने मनात विचार केला की एक मुलगा गेला तरी एक राहील. ती त्या गोसाव्याला म्हणाली, 'ठीक आहे. एक मुलगा तुम्हाला देईन. तुमच्या कृपेने एक तरी आमच्याजवळ राहील.

बारा वर्षे तुमची वाट पाहू. द्या, मला पुत्ररत्न द्या. माझ्या मांडीवर बाळ खेळो. माझी मांडी धन्य होवो.'

त्या गोसाव्याने राणीस कसली तरी मुळी दिली. तो म्हणाला, 'ही मुळी खा. पुढे तुम्हाला दोन आवळे जावळे मुलगे होतील. मी आता जातो.' असे म्हणून गोसावी निघून गेला.

राणीने सारी हकीगत राजाला सांगितली. राजाला फार आनंद झाला. पुढे राणीला दोन मुलगे झाले. ते फारच सुंदर होते. जसे चंद्र सूर्य तसे ते दिसत. राजाने मोठा सोहळा केला. हत्तीवरून साखऱ्या वाटल्या. तुरुंगातले सारे कैदी सोडण्यात आले. शेतकऱ्यांना शेतसारा एक वर्षभर माफ करण्यात आला. शाळांना देणग्या मिळाल्या. प्रजेला सुख झाले. सारी प्रजा म्हणू लागली, 'राजाचे मुलगे उदंड आयुष्याचे होवोत.'

दिवसेंदिवस राजाचे मुलगे वाढू लागले. त्यांच्या अंगाखांद्यांवर हिऱ्यामोत्यांचे दागिने होते. त्यांचे केस काळेभोर होते. डोळे कमळासारखे होते. नाके सरळ व तरतरीत होती. त्यांचे दात मोत्यांसारखे होते. मुलांवरून डोळे काढून घेऊ नये असे पाहणारास होई. राजाराणी आनंदी झाली. मुलांना खेळताना पाहून राणीला धन्य वाटे. आईच्या मांडीवर आधी जाऊन कोण बसतो अशा शर्यती ते लावीत. एकदम धावत येत व आईला मिठी मारीत. राणीला मुले कोठे ठेवू, कोठे न ठेवू असे झाले.

परंतु राणीच्या मनात एक दुःख होते. दोन्ही मुलगे ती जवळ घेई व तिच्या डोळ्यांतून एखादे वेळेस पाणी येई. कुठला मुलगा यांतून जाईल, तो गोसावी कोणता मुलगा मागेल, हे मनात येऊन तिचा जीव खालीवर होई. एक दिवस गेला म्हणजे तिला हायसे वाटे.

त्या दोन मुलांतील एक राजाचा आवडता होता व एक राणीचा. एक राजाजवळ निजे, एक राणीजवळ निजे. एक राजाबरोबर फिरावयास जाई, एक राणीबरोबर.

पाच वर्षे गेली, दहा वर्षे गेली. राणीला वाटले की तो गोसावी अजून येत नाही. तो मेला असेल. तिला वाटले आता कोणी येत नाही, मुलगा काय कोणी मागत नाही. बारा वर्षे संपत आली. राणी राजाला म्हणाली, 'उद्याचा शेवटचा दिवस गेला की बारा वर्षे संपतात. देव करो व दोन्ही लेकरे नांदोत.'

दुसरा दिवस उजाडला. राणीच्या मनाला अस्वस्थ वाटत होते. बाहेर गार वारा वाहात होता. आकाशात ढग आले होते. राहून राहून राणीला रडू येत होते. आज तिने दोन्ही मुलांना डोळ्याआड होऊ दिले नाही. होता होता सायंकाळ झाली. पाखरे घरट्यात गेली. गाई हंबरत गोठ्यात आल्या. दिवे लावण्याची वेळ झाली. राणी तुळशीच्या अंगणात दोन्ही मुलांना घेऊन बसली होती. इतक्यात अंगणात तो गोसावी येऊन उभा राहिला. जणू काळपुरुष येऊन उभा राहिला. राणीच्या पोटात धस्स झाले. ती उठेना, बोलेना. तो गोसावी रागाने म्हणाला, 'सारे जग कृतघ्न आहे. घ्यायच्या वेळी जगाला आनंद वाटतो. द्यायच्या वेळेस मात्र दुःख, घ्यायच्या वेळेस दुनिया पाया पडते, द्यायच्या वेळेस कोणी नाही. राणी, मला ओळखलंस का ? मीच तुला हे मुलगे दिले. यांतील एक मला दे.'

राजा तेथे धावत आला. राजा राणी रडू लागली. एक राजाचा आवडता, एक राणीचा आवडता. कोणता घ्यावा, कोणता सोडावा ? शेवटी राजाने स्वतःचा आवडता मुलगा गोसाव्यास दिला. राजा म्हणाला, 'बाळ, जा. देव तुला सुखी ठेवो.'

तो मुलगा जाताना आईला म्हणाला, 'आई रडू नकोस, बाबा, रडू नका. माझ्यावर जर काही संकट आले तर अंगणातले हे तुळशीचे झाड जोराने सारखे हलू लागेल. जर या झाडाच्या फांद्या जोराने हलू लागल्या तर समजा की माझ्यावर संकट आहे. मग माझ्या शोधासाठी धाकट्या भावास पाठवा, तो मला सोडवून आणील.' असे बोलून त्याने धाकट्या भावास पोटाशी धरले. आईबापांस वंदन केले. गडीमाणसांचे निरोप घेतले. सर्वांच्या डोळ्यांत पाणी आले. बायकामाणसांना हुंदके आले व ते आवरत ना.

तो गोसावी त्या वडील मुलास घेऊन निघून गेला. गोसाव्याच्या पाठोपाठ तो वडील मुलगा जात होता. मधूनमधून त्याला घरची आठवण येत होती. त्याला मध्येच ठेच लागे. 'आईने आठवण काढली का बाबांनी' असे तो स्वतःशी म्हणे. जाता जाता वाटेत एके ठिकाणी त्याला दोन सशाची पिले दिसली. त्या पिलांतील एक आपल्या आईस म्हणाले, 'आई, त्या दोन राजपुत्रांतील एक चालला, त्याच्याबरोबरच मी जाऊ ?' आई म्हणाली, 'जा.' ते सशाचे पिलू त्या राजपुत्राच्या पाठोपाठ जाऊ लागले. किती सुंदर व गोजिरवाणे होते

ते. त्याचा रंग पांढरा होता. राजपुत्राने ते पिलू उचलून घेतले व आपल्या पिशवीत ठेवले. ते पुढे गेले तो एका झाडावर दोन लहान साळुंकीची पिले होती. त्यांतील एक आपल्या आईला म्हणाले, 'आई, तो बघ दोन राजपुत्रांतील एक चालला, मी पण त्याच्याबरोबर जाऊ?' आई म्हणाली, 'जा, बेटा.' ते साळुंकीचे पिलू राजपुत्राच्या खांद्यावर येऊन बसले. राजपुत्राने त्याला आपल्या खिशात लपवले. गोसावी व राजपुत्र आणखी पुढे गेले. तेथे एक कुत्री होती. कुत्रीची दोन पिले होती. एक पिलू आईस म्हणाले, 'आई, त्या दोन राजपुत्रांतील एक चालला, मी जाऊ त्याच्याबरोबर?' आई म्हणाली, 'जा. काही हरकत नाही.' ते कुत्रीचे पिलू कुरकुर करीत राजपुत्राच्या पाठोपाठ निघाले. राजपुत्राने ते आपल्या पिशवीत ठेवले. असे करताकरता ते दोघेजण घोर जंगलात आले. अगदी किर्र झाडी होती. सूर्याचे किरण सुद्धा तेथे शिरकत नव्हते.

तो गोसावी तेथे थांबला. जवळच एक घर होते. त्या घराकडे बोट करून गोसावी म्हणाला, 'बेटा, हे तुझे घर. तू ह्या घरात राहात जा. या जंगलात वाटेल तिकडे हिंड, फीर. वाटेल त्या झाडाचे फळ खा, वाटेल त्या झऱ्याचे पाणी पी. येथील झाडांना नेहमी बारा महिने फळे असतात व ती अमृतासारखी गोड असतात. येथील ओढ्यांना बारा महिने तेरा काळ पाणी असते, ते स्फटिकासारखे स्वच्छ, भिंगाप्रमाणे निर्मळ असते. येथे अनेक फुलझाडे आहेत. त्यांचे हार घाल. मोरांची पिसे सापडतील, त्यांचे मुगुट करून डोक्यात घाल. तुला येथे मोकळीक आहे. या रानाचा तू राजा; परंतु एक गोष्ट लक्षात ठेव की उत्तर दिशेला मात्र जावयाचे नाही. तिकडे जाशील तर धोका आहे. पूर्व, पश्चिम, दक्षिण या दिशांत तुला मोकळीक आहे. मी आता जातो. मी केव्हा येईन त्याचा नेम नाही. तू काळजी करू नकोस. सुखाने राहा.' असे म्हणून तो गोसावी निघून गेला.

राजपुत्र तेथे एकटाच राहिला. त्याने पोटभर फळे खाल्ली. झऱ्याचे गोड पाणी प्यायला. फुलांच्या वनमाळा त्याने गळ्यात घातल्या. त्याने साळुंकीच्या पिलास, सशाच्या पिलास, कुत्रीच्या पिलास खायला दिले. त्यांना बरोबर घेऊन तो हिंडला. शेवटी दमला व त्या घरात जाऊन झोपला.

एके दिवशी त्या राजपुत्राला एक सुंदर हरिण दिसले. त्या हरणाच्या पाठोपाठ तो जाऊ लागला. हरिण उत्तर दिशेला पळू लागले. उत्तर दिशेस जावयाचे

नाही ही गोष्ट राजपुत्र विसरला. त्याला जणू भूल पडली. हरणाचा पाठलाग करीत तो चालला; परंतु हरिण एकदम दिसेनासे झाले. तो इकडेतिकडे पाहातो तो हरिण कोठेही नाही. तो चकित झाला. इतक्यात त्याला एका झाडाखाली एक सुंदर स्त्री दिसली. तो तिच्याजवळ गेला व म्हणाला, 'तुम्हाला हरिण दिसले का? किती सुंदर होते! कोठे गेले कोणास माहीत?'

ती म्हणाली, 'मला माहीत नाही. मी येथे बसलेली असत्ये. येणारा जाणारा पाहून खेळायला बोलावते. या. तुम्ही माझ्याबरोबर खेळा. काही तरी पणास लावा. हे पाहा फासे तुमची वाट पाहात आहेत.' असे म्हणून तिने फासे हातात खुळखुळवले. राजपुत्र स्वाभिमानी होता. त्याने खेळण्याचे ठरविले. दोघेजण खेळू लागली. राजपुत्राने प्रथम सशाचे पिलू लावले, परंतु त्या स्त्रीने ते जिंकून घेतले. राजपुत्रावर हार आली. राजपुत्र पुन्हा खेळू लागला. त्याने ते साळुंकीचे पिलू पणाला लावले. पुन्हा राजपुत्र हरला. तो अधिकच हट्टास पेटला. त्याने ते कुत्रीचे पिलू पणाला लावले, तेही त्या स्त्रीने जिंकून घेतले. आता पणाला लावावयास काय उरले? तो राजपुत्र म्हणाला, 'मी सर्वस्व गमावून बसलो. आता खेळ पुरे.' ती स्त्री म्हणाली, 'आता स्वतःला पणास लाव. अजून तू शिल्लक आहेस.'

राजपुत्राने स्वतःला पणास लावले. खेळता खेळता राजपुत्र हरला. त्या स्त्रीने राजपुत्राला जिंकले व त्याला गुलाम केले. ती स्त्री म्हणजे एक दुष्ट राक्षसीण होती. ती कपटी व मायावी होती. तिने राजपुत्राला लहान डुक्कर केले. सशाचे पिलू, साळुंकीचे पिलू, कुत्रीचे पिलू व तो डुक्कर झालेला राजपुत्र, चौघांना घेऊन राक्षसीण निघाली. ती आपल्या गुहेत आली व म्हणू लागली की, 'चार दिवस आता चांगली मेजवानी होईल. पहिल्या दिवशी सशाचे पिलू, दुसऱ्या दिवशी साळुंकी, तिसऱ्या दिवशी कुत्र्याचे पिलू आणि चौथ्या दिवशी मजा!'

इकडे काय झाले, तुळशीच्या अंगणातील ते झाड गदगदा हलू लागले. राणीला दासदासी सांगू लागल्या. राजाराणी अंगणात आली. धाकटा राजपुत्र तेथे धावत धावत आला. तो म्हणाला, 'आई, दादा संकटात आहे, त्याची ही खूण. मला जाऊ दे. दादाला मी सोडवून घेऊन येतो.' राणीला रडू आले. एक गेला व आता दुसरा चालला. काय होईल कोणास कळे. कठीण प्रसंग.

शेवटी शोक आवरून तिने निरोप दिला. आईबापांच्या पाया पडून राजपुत्र निघाला.

वाटेत एके ठिकाणी ते सशाचे दुसरे पिलू होते. ते आपल्या आईस म्हणाले, 'आई, तो दुसरा राजपुत्र निघाला. मी पण जाऊ?' आई म्हणाली, 'जा.' ते गुबगुबीत सशाचे पिलू राजपुत्राच्या पाठोपाठ निघाले. राजपुत्राने ते उचलून घेतले व आपल्या पिशवीत ठेवले. तो पुढे गेला. तो ते दुसरे साळुंकीचे पिलू तेथे होते. ते पिलू आपल्या आईस म्हणाले, 'आई, तो बघ दुसरा राजपुत्र चालला, मी पण जाऊ?' आई म्हणाली, 'जा, बेटा.' ते साळुंकीचे पिलू राजपुत्राच्या खांद्यावर येऊन बसले. राजपुत्राने त्याचा मुका घेतला व आपल्या खिशात ते ठेवून दिले. आणखी पुढे जातो तो तेथे कुत्रीचे दुसरे पिलू होते. ते आपल्या आईस म्हणाले, 'आई, तो बघ छोटा राजपुत्र पण चालला, मीही जाऊ?' आई म्हणाली, 'जा.' ते कुत्रीचे पिलू राजपुत्राच्या पाठोपाठ जाऊ लागले. राजपुत्राने ते उचलून घेतले व त्याला मोठ्या पिशवीत ठेवून दिले. असे करताकरता तो राजपुत्र घनदाट रानात शिरला. झाडांवर रसाळ फळे होती; ओढ्यांना स्वच्छ पाणी होते. त्याने पोटभर फळे खाल्ली; तो मनमुराद पाणी प्यायला. फुलांच्या माळा करून त्याने गळ्यात घातल्या. असे करीतकरीत तो उत्तर दिशेला चालला, इतक्यात त्याला एक सुंदर हरिण दिसले. तो हरणाच्या पाठोपाठ लागला. दूरवर तो पळत पळत आला. परंतु एकाएकी हरिण अदृश्य झाले. ते कोठेच दिसेना. राजपुत्र चारी दिशांस पाहात उभा राहिला. त्याला एका झाडाखाली एक सुंदर स्त्री दिसली. तो तिच्याजवळ गेला व म्हणाला, 'बाई, तुम्हाला एखादे हरिण दिसले का? मी त्याच्या पाठोपाठ येत होतो, परंतु ते एकाएकी नाहीसे झाले.'

ती स्त्री म्हणाली, 'मला हरिणबिरीण माहीत नाही, मी येथे बसलेली असत्ये. येणाऱ्या जाणाऱ्यास खेळण्यासाठी बोलावते. या. तुम्ही माझ्याबरोबर खेळा. हे फासे तुमची वाट पाहात आहेत. नुसते खेळू नका. त्यात राम नसतो. काही पणास लावा.'

राजपुत्रास नाही म्हणवेना. तो स्वाभिमानी होता. तो खेळू लागला. तो म्हणाला, 'मी हे सशाचे पिलू पणास लावतो. परंतु तुम्ही काय पणास लावता?' ती स्त्री म्हणाली, 'मी जर हरल्ये, तर असेच एक सशाचे पिलू मी देईन.'

दोघे खेळू लागली. शेवटी राजपुत्राने तिला जिंकले. त्या स्त्रीने तसेच एक सशाचे पिलू त्या राजपुत्राला दिले. सशाची दोन्ही पिले एकमेकांस भेटली, नाचली. पुन्हा खेळ सुरू झाला. राजपुत्र म्हणाला, 'आता मी साळुंकीचे पिलू पणास लावतो, तुम्ही काय लावता?' ती स्त्री म्हणाली, 'मी जर हरल्ये, तर असेच एक साळुंकीचे पिलू तुम्हास देईन.'

दोघे खेळू लागली. जोराजोराने फासे पडू लागले. पुन्हा एकदा राजपुत्राने तिला जिंकले. तिने साळुंकीचे पिलू काढून राजपुत्राला दिले. साळुंकीची दोन्ही पिले एकमेकांस भेटली, नाचली. खेळ पुन्हा सुरू झाला. राजपुत्र म्हणाला, 'आता मी कुत्रीचे पिलू पणास लावतो, तुम्ही काय लावता?' ती स्त्री म्हणाली, 'मी त्या कुत्रीच्या पिलासारखेच पिलू तुला देईन.'

दोघे खेळू लागली. ती स्त्री मोठ्या शिताफीने खेळत होती; परंतु काय असेल ते असो. याही वेळेस ती हरली. ती खट्टू झाली. तिने कुत्रीचे पिलू काढून राजपुत्राला दिले. दोन्ही पिले परस्परांस भेटली. एकमेकांना चाटती झाली. पुन्हा खेळ सुरू झाला. राजपुत्र म्हणाला, 'आता मी स्वतःला पणास लावतो. तुम्ही काय पणास लावता?' ती स्त्री म्हणाली, 'मी जर हरल्ये, तर तुमच्यासारखा एक मुलगा मी तुम्हाला देईन.'

राजपुत्र जपून खेळू लागला. त्याच्या हृदयात आशा खेळू लागली. शेवटी त्याने त्या स्त्रीला जिंकून घेतले. तिने त्या डुकराचा पुन्हा राजपुत्र केला व तो त्याच्या स्वाधीन केला. दोघे भाऊ एकमेकांस भेटले. जशी रामभरतांची भेट. क्षणभर कोणास काहीच बोलवेना. हृदये भरून आली होती त्यांची.

ती स्त्री म्हणाली, 'जा मुलांनो, जा, परंतु एक गोष्ट सांगते, ती लक्षात ठेवा. ज्या गोसाव्याने या राजपुत्राला आणले आहे, तो मोठा दुष्ट आहे. तो या राजपुत्राचा बळी देणार आहे. उद्या त्या रानातील घरात तुला पाहावयास तो येईल व देवीच्या देवळात तुला घेऊन जाईल. तेथे तो देवीची पूजा करील व शेवटी 'देवीला नमस्कार कर' असे तुला तो सांगेल. नमस्कार करावयास लोटांगण घालताच तो गोसावी तुझ्यावर तरवारीचा वार करील व तुला मारील. यासाठी मी सांगते तसे कर. तो गोसावी जेव्हा नमस्कार कर असे सांगेल, तेव्हा तू त्याला म्हण, 'मी राजाचा मुलगा आहे. मला लोक नमस्कार करतात, मी कोणास करीत नाही. साष्टांग नमस्कार कसा घालावयाचा, हे तुम्ही दाखवा.

मग मी तसा नमस्कार करीन.' तो गोसावी नमस्कार करण्यासाठी वाकताच त्याच्यावर तरवारीचा वार करून ठार करा. जा. तुमचे भले होवो.'

ते दोघे राजपुत्र वनात आले. मोठा राजपुत्र घरात राहिला व धाकटा भाऊ बाहेरच लपून राहिला. रात्रीची वेळ झाली होती. तो गोसावी एकाएकी तेथे आला. तो राजपुत्र घरात आहे असे पाहून त्याला आनंद झाला. सकाळ झाली, पाखरे किलबिल करू लागली. तो गोसावी त्या राजपुत्राला म्हणाला, 'तू येथे आहेस, हे पाहून मला किती आनंद झाला! माझ्या सांगण्याप्रमाणे तू वागलास, चांगले केलेस. आता आज तुला मी देवीच्या देवळात घेऊन जाणार आहे. देवीच्या पायांवर वाहाणार आहे. चल.'

ते दोघे निघाले. त्यांच्या पाठोपाठ लपतछपत तो धाकटा भाऊही चालला. रानाच्या मध्यभागी देवीचे मंदिर होते. त्या मंदिरात तो गोसावी व तो मोठा राजपुत्र शिरले. ते आत शिरताच एकदम मोठा हास्यध्वनी आला. राजपुत्र पाहू लागला. तो तेथे त्याला अकरा मुंडकी टांगलेली दिसली. ती मुंडकी त्याच्याकडे बघून खदखदा हसत होती. तो गोसावी देवीच्या पूजेला बसला. पूजा झाली. शंख फुंकला गेला. तो गोसावी बाहेर आला व त्या राजपुत्राला म्हणाला, 'बाळ, चल, देवीला साष्टांग नमस्कार घाल.' तो राजपुत्र म्हणाला, 'नमस्कार कसा करावयाचा ते मला माहीत नाही. तुम्ही नमस्कार कसा करावयाचा ते दाखवा.' तो गोसावी नमस्कार करण्यासाठी वाकला. राजपुत्राने तेथली तरवार एकदम घेतली व त्या गोसाव्याचे मुंडके उडवले. गोसाव्याचे मुंडके तुटताच त्या अकरा मुंडक्यांतून अकरा राजपुत्र जिवंत होऊन बाहेर पडले.

राजपुत्राचा धाकटा भाऊ मंदिरात आला. मोठा राजपुत्र त्या सजीव झालेल्या अकरा राजपुत्रांस म्हणाला, 'मी मंदिरात येताच, तुम्ही का बरे हसलात?' ते राजपुत्र म्हणाले, 'आम्हाला त्या गोसाव्याने असेच फसवून आणले व मारले. आमच्याचप्रमाणे तूही फसून आलास, म्हणून आम्ही हसलो. आम्ही तुझे उपकार कसे फेडणार? आम्हाला तू जीवदान दिलेस. आमचे आईबाप आमच्यासाठी झुरत असतील. त्यांची व आमची भेट होईल.'

ते दोघे राजपुत्र त्या अकराजणांस म्हणाले, 'प्रथम तुम्ही आमच्या राजधानीस चला. तेथे तुम्ही काही दिवस राहा. तुमच्या घरी आपण जासूद पाठवू. तुमचे आईबाप येतील. मोठा सोहळा होईल.' त्या अकराजणांनी कबूल



केले. ते अकरा व हे दोन असे तेरा राजपुत्र घरी आले. राजाराणीस आनंद झाला. गुढ्या, तोरणे उभारली. मोठा समारंभ झाला. त्या अकरा राजपुत्रांच्या घरी कळवण्यात आले. त्यांचे आईबाप धावतच तेथे आले. देशोदेशीचे राजे महाराजे त्या नगरीत आले. आईबापांना मुले भेटली. तो आनंद कसा वर्णावा! किती सांगावा? अगणित संपत्ती वाटण्यात आली. कोट्यवधी लोकांस अन्नदान, वस्त्रदान झाले. जिकडेतिकडे आनंदीआनंद झाला. चार दिवस सोहळा होऊन ते अकरा राजपुत्र आपल्या आईबापांसह आपापल्या राज्यांत निघून गेले. ते दोघे राजपुत्र मोठ्या आनंदाने राहिले. ती दोन सशाची पिले, ती साळुंकीची पिले व ती कुत्रीची पिले, ती सर्व आनंदात आहेत. त्यांची काळजी घेण्यात येते.

राजाचा आवडता मुलगा राजास मिळाला, राणीचा राणीस मिळाला. तुळशीच्या अंगणातील झाड हलेनासे झाले. प्रजा सुखी झाली. त्यांना सुख झाले तसे तुम्हा आम्हा सर्वांस होवो, दुसरे काय?

''**आमची गोष्ट संपली**
**शेरभर साखर वाटली**''



खरा मित्र : कथा पाचवी

# सोन्याची साखळी



एक होता राजा. त्याला दोन राण्या होत्या; परंतु दोघींनाही मूलबाळ नव्हते. आपल्या राज्याला पुढे वारस कोण, असा विचार मनात येऊन राजा दुःखी होई. कशाला हे राज्य, कशासाठी ही धनदौलत, ही कोणाच्या स्वाधीन करू, असे विचार सारखे त्याच्या मनी घोळत. राजाचे दुःख पाहून राण्याही दुःखी होत.

एके दिवशी कोणी तरी एक बोवा आला होता. एक राणी तेथे होती. राणी रडत होती. बोवाजी म्हणाला, 'राणी, राणी तुझ्या डोळ्यांत का पाणी? राजाची राणी असून दुःखी का? दासदासी पदरी असून दुःखी का? रथ, घोडे, हत्ती असून दुःखी का? तुम्हाला काय कमी? तुम्हाला कसला तोटा? तुम्हासारख्या श्रीमंतांनी रडावे मग गरिबांनी काय करावे? देवाने तुम्हाला भाग्य दिले, राज्य दिले. रडू नका, रुसू नका, सुखाने नांदा.'

डोळ्यांत पाणी आणून राणी म्हणाली, 'शेतात पीक नाही तर शेताला शोभा नाही; तळ्यात कमळ नाही तर तळ्याला शोभा नाही; आकाशात चंद्र नाही तर आकाशाला शोभा नाही; झाडाला फळ नाही तर झाडाला शोभा नाही; शिंपल्यात मोती नाही तर शिंपल्याला शोभा नाही. महाराज, जिला पुत्र नाही, त्या स्त्रीच्या जगण्यात काय अर्थ? मला 'आई' अशी हाक कोण मारील? पुत्रवती जी आहे तीच खरी सुखी, तीच भाग्याची, तीच दैवाची. देवाने सारे दिले परंतु हे दिले नाही; देवाने सोने दिले परंतु सोनुकला दिला नाही. मी रडू नको तर काय करू? राजाचे दुःख पाहून मला प्राण नको असे वाटते. तुम्ही तरी कृपा करा, मला मुलगा द्या.'

बोवाजीस दया आली. तो म्हणाला, 'माझ्या कृपेने तुम्हाला पुत्र होईल; परंतु दुसरी राणी त्या मुलाचा द्वेष करील. त्याला मारू पाहील. म्हणून मी एक युक्ती करतो. तुमच्या मुलाचे प्राण तुमच्या या राजधानीत जे मोठे तळे आहे, त्या तळ्यात जो एक सोन्यासारखा मासा आहे त्याच्या पोटात ठेवतो. त्या माशाच्या पोटात मी एक सोन्याची साखळी ठेवीन. ती जोपर्यंत तेथे आहे तोपर्यंत तुमच्या मुलाचे प्राण सुरक्षित राहातील.'

राणीला वर देऊन तो बोवाजी निघून गेला. पुढे काही दिवस गेले. राणीला मुलगा झाला. नवानवसाचा मुलगा. कोण आनंद, कोण उत्सव! मोठमोठ्या श्रीमंतांच्या बायका राणीला बाळंतविडा घेऊन आल्या. बाळ कसा नक्षत्रासारखा होता. ही राणी राजाची आवडती राणी झाली. राजा दुसऱ्या राणीचे तोंड देखील पाहीना. ती राणी या राणीचा हेवा करू लागली, हिच्या मुलास पाण्यात पाहू लागली. त्या गोड मुलाला पाहून साऱ्यांना आनंद होई, परंतु त्या सावत्र आईचा संताप होई. सावत्र आई कधी त्याला मारी, कधी रडवी.

राजपुत्र दिवसेंदिवस वाढत होता. तो आता पाचसहा वर्षांचा झाला. बाहेर हिंडे, फिरे, खेळे. तो सर्वांचा आवडता होता. सर्वांना हवासा वाटे. त्याला गर्व नव्हता. तो कोणाशी भांडत नसे. साऱ्यांशी खेळे. दिसायला गोड व गुणांनी गोड. बाहेर गोरापान होता, तसाच मनाचा निर्मळ होता. आनंदात दिवस जात होते. राजपुत्राला कबुतरे फार आवडत. त्याने सुंदर कबुतरे पाळली होती. एक दिवस त्याचे आवडीचे कबुतर उडाले, ते थेट सावत्र आईच्या घरात शिरले. राजपुत्र रडत तेथे गेला. तो म्हणाला, 'माझे कबुतर दे.' ती सावत्र आई म्हणाली, 'देत नाही जा. तुझी कबुतरे माझ्या घरात कशाला शिरतात? मारून टाकते त्याला. तुमचे होतात खेळ, परंतु आम्हाला त्रास. घरात कबुतरे येतात, हगतात, घाण करतात. जा, नीघ येथून.' राजपुत्र रडू लागला. शेवटी त्या सावत्र आईने ते कबुतर दिले. राजपुत्र आनंदला व हसत गेला.

परंतु रोज आपले असे व्हावयाचे. ते कबुतर त्या सावत्र आईच्या घरात नेमके उडून जायचे. राजपुत्र तिची मनधरणी करावयाचा व मग ते मिळावयाचे. एके दिवशी ती सावत्र राणी काही केल्या कबुतर देईना. राजपुत्र म्हणाला, 'तू सांगशील ते मी करीन, परंतु माझे कबुतर दे.' सावत्र आई म्हणाली,

तुझ्या आइला तू तुझा प्राण कशात आहे ते विचार. ती जे सांगेल, ते मला येऊन सांग. कबूल कर, म्हणजे कबुतर देते.' राजपुत्राने कबूल केले.

कबुतर घेऊन राजपुत्र गेला. तो खेळात दंग झाला. दिलेले वचन विसरला. दुसरा दिवस उजाडला. पुन्हा ते कबुतर गेले. सावत्र आईजवळ राजपुत्र रडत आला. ती रागाने म्हणाली, 'देत नाही. मेल्या, तू खोटारडा आहेस. दिलेले वचन पाळीत नाहीस, दिलेले शब्द मानीत नाहीस. हो चालता येथून.' राजपुत्र गयावया करू लागला. 'आईला आज विचारतो व तुला येऊन सांगतो. एरवी जेवणार नाही. विद्येची शपथ.' असे तो म्हणाला. सावत्र आईने कबुतर दिले.

राजपुत्र कबुतर घेऊन आपल्या आईजवळ आला. आईने त्याचा मुका घेतला. त्याच्या सुंदर केसांवरून हात फिरवला. त्याच्या तोंडावरचा घाम तिने पदराने पुसला. बाळ आईला म्हणाला, 'आई, माझा प्राण कशात आहे ते मला सांग. तू सांगितले नाहीस तर मी जेवणार नाही. मला खरे सांग. खोटे कधी सांगू नये.' राणी म्हणाली, 'बाळ, हे वेड कोणी शिकविले? कोणी तुला विचारावयास सांगितले? असल्या गोष्टी विचारू नये. तू खावे, खेळावे, सुखाने नांदावे.' राजपुत्र ऐकेना. तो हट्ट धरून बसला व रडू लागला. शेवटी राणीच्याने राहवेना. ती म्हणाली, 'ऐक, रडू नको. रडूनरडून डोळे सुजले. किती बरे रडशील! ऐक; परंतु दुसऱ्या कोणास सांगू नकोस. आपल्या गावात जे मोठे तळे आहे, त्यात जो सोन्यासारखा एक मासा आहे, त्या माशाच्या पोटात एक सोन्याची साखळी आहे. त्या साखळीत तुझे प्राण आहेत. जा, आता खेळ, कुणास सांगू नकोस.'

राजपुत्र बाहेर गेला. तो सावत्र आईकडे आला. त्याच्या मनात शंका नव्हती. लहान मुलाला शंका नसते. त्याचे मन निर्मळ असते, जसे गंगेचे पाणी. लहान मुलांचा सर्वांवर विश्वास असतो. राजपुत्राने आईने जे सांगितले, ते सावत्र आईस सांगितले व खेळावयास निघून गेला.

त्या सावत्र आईने गावातील एका कोळ्याला बोलावले. ती त्या कोळ्याला म्हणाली, 'रात्रीच्या वेळी त्या तळ्यावर जा. त्या तळ्यातील मासे पकड. त्या माशांत एक सोनेरी रंगाचा मासा आहे, तो पकडून घेऊन ये.'

बाहेर रात्र झाली. सारी सृष्टी झोपली. घुबडे जागी होती आणि तो कोळी जागा होता. त्याने आपले भले मोठे जाळे टाकले होते. जाळे टाकी व थोड्या

वेळाने ओढी. किती तरी मासे त्याने मारले, परंतु सोनेरी मासा दिसेना. आता शेवटचे एक वेळ जाळे टाकू असे म्हणून त्याने जाळे फेकले व ओढले. एकच मासा त्यात आला होता व तो चमकला. कोळ्याला आनंद झाला. सोन्यासारखा मासा त्याने पिशवीत घातला. केव्हा उजाडते याची तो वाट पाहू लागला.

सकाळ झाली. सूर्यनारायण वर आला. फुले फुलली. तळ्यातून कमळे माना वर करून सूर्यास पाहून हसू लागली; परंतु राजपुत्र आज अजून उठला नाही. त्याचे तोंड हसले नाही. त्याची आई त्याला पाहावयास गेली. बिछान्याजवळ जाऊन राणी म्हणाली, 'ऊठ बेटा, किती उजाडले. तो बघ चौघडा वाजत आहे. मंदिरात आरती होत आहे. ऊठ राजा. आज तोंड सुकलेले का? रात्री नीज नाही का आली? मी नेहमी म्हणते, माझ्या कुशीत नीज. आईच्या कुशीतच बाळाला खरी झोप येते. बरे नाही का वाटत?'

राजपुत्राला बरे वाटत नव्हते. त्याचे प्राण कासावीस होत होते. जीव व्याकुळ झाला होता. जिकडेतिकडे एकच हाक झाली. राजा आला. राजपुत्राच्या बिछान्याशेजारी सारी बसली. हकीम, वैद्य सारे जमले. मोठमोठे धन्वंतरी आले, नाडी पाहू लागले, लक्षणे पाहू लागले. कोणालाही परीक्षा होईना. सर्वांची तोंडे सुकून गेली. 'आई, आई' असे राजपुत्र म्हणे व तळमळे; त्या वेळेस सर्वांच्या डोळ्यांना टचकन् पाणी येई.

इकडे तो कोळी सावत्र आईकडे आला. त्याने तो मासा तिला दिला. ती राक्षसीण आनंदली. त्या कोळ्याला तिने गळ्यातील मोत्यांचा हार दिला. कोळी मनात म्हणाला, 'एक रात्रभर उजागरा केला, शंभरदा जाळे फेकले, दमलो, परंतु जन्माचे दारिद्र्य गेले. घरची ददात गेली, माझी मुलेबाळे सुखाने खातील.'

कोळी निघून गेला. राणीने हातात सुरी घेतली. इकडे राजपुत्राचे प्राण फारच कासावीस होऊ लागले. 'वाचवा हो माझ्या बाळाला! कोणी तरी वाचवा हो!' असा हंबरडा त्याची आई फोडू लागली.

सावत्र आईने तो मासा चिरला. त्या माशाच्या पोटात सोन्याची साखळी होती. ती काढून तिने आपल्या गळ्यात घातली. तिने ती गळ्यात घालताच इकडे राजपुत्राचे प्राण निघून गेले. आईच्या मांडीवर तो मरून पडला. तेथील शोक किती वर्णावा, किती सांगावा? आईचा पुत्रशोक आईलाच ठाऊक. दुसऱ्याला त्याची कल्पना कोठून येणार?

राजपुत्राच्या शरीराला अग्नी देणार इतक्यात प्रधानाचा मुलगा तेथे आला. त्याचे राजपुत्रावर फार प्रेम होते. तो राजाला म्हणाला, 'हा देह जाळू नका. हा मला द्या. मला नाही म्हणू नका.' राजा म्हणाला, 'जशी तुझी इच्छा. घेऊन जा हा देह.' सारी मंडळी घरी गेली. प्रधानाच्या मुलाने तो देह पालखीत घालून घरी नेला. पुढे त्याने काय केले? गावाबाहेर त्याच्या मालकीची एक मोठी बाग होती. त्या बागेत बरोबर मध्यावर त्याने एक सुन्दर इमारत लगेच बांधविली. एका दिवसात ती इमारत तयार झाली. त्या इमारतीत एक सुंदर पलंग ठेवण्यात आला व त्या पलंगावर त्याने राजपुत्राचा मृत देह ठेवून दिला.

रात्रीची वेळ झाली. सावत्र राणीला फार आनंद झाला होता. त्या आनंदात तिला झोप येईना. गळ्यातील ती माळ खुपत होती. तिने ती सोन्याची साखळी गळ्यातून काढताच तिकडे बागेत तो राजपुत्र जिवंत झाला. तो जिवंत होऊन पाहातो तो आजूबाजूस कोणी नाही तो बागेत हिंडला शेवटी दमून त्या पलंगावर जाऊन निजला. रोज आपले असे व्हायचे. रात्री राजपुत्र जिवंत व्हायचा व दिवसा मरून पडायचा. जणू रात्री जागा असे व दिवसा झोपत असे.

प्रधानाचा मुलगा एक दिवस सकाळी बागेत गेला. तो त्या इमारतीत शिरला. राजपुत्र एका कुशीवर झोपल्यासारखा पडला होता. राजपुत्राचे तोंड टवटवीत दिसत होते. देह सडला नाही, कुजला नाही. घाण सुटली नाही. प्रधानाच्या मुलास आश्चर्य वाटले. रात्री येऊन पाहावे असे त्याने ठरविले.

रात्र झाली. बाहेर सुंदर चांदणे पडले होते. सावत्र राणी झोपली होती. तिने गळ्यातील साखळी काढून ठेवली. इकडे राजपुत्र जागा झाला. खावयास न मिळाल्यामुळे तो अशक्त झाला होता. अंथरुणातच तो पडला होता व विचार करीत होता इतक्यात प्रधानाचा मुलगा तेथे आला त्याला पाहाताच तो उठून बसला. मित्र मित्राला भेटला. क्षणभर दोघांना बोलवेना, हृदये भरून आली होती. दोघांना गहिवर आला होता. राजपुत्र म्हणाला, 'मी रोज रात्री जागा होतो; परंतु उजाडते कधी ते समजतच नाही. मी दिवसा मरून पडतो व रात्री जिवंत असतो.' प्रधानाचा मुलगा आश्चर्य करू लागला, परंतु तो आपल्या मित्रास म्हणाला, 'आधी ही फळे आणली आहेत, ती तर खा. रोज तुला मी रात्री खावयास घेऊन येईन. तू काळजी करू नकोस. हे कोडे काय ते उलगडलेच पाहिजे.' दोघे मित्र बागेत हिंडले, फिरले. शेवटी येऊन दोघे निजले.

बाहेर उजाडले. पाखरांच्या किलबिलीने प्रधानाचा मुलगा जागा झाला, परंतु त्याचा मित्र तेथेच मरून पडला होता.

प्रधानाचा मुलगा रोज रात्री तेथे खावयास घेऊन येई. कधी तेथेच झोपे. कधी घरी जाई. कधी गावाला जावयाचे असले म्हणजे तो दोनचार दिवसांना पुरेल इतके खाणे तेथे कपाटात ठेवून जाई. असे चालले होते.

एके दिवशी दूर एका रस्त्याने एक गरीब बाई चालली होती. ती म्हातारी होती. तिच्याबरोबर तिची मुलगी होती. मुलगी मोठी देखणी होती. आपल्या म्हाताऱ्या आईला तिचा हात धरून ती नेत होती. इतक्यात कोणी तरी एक विचित्र प्राणी त्यांना दिसला. म्हातारी त्या प्राण्याला म्हणाली, 'तू कोण? आमच्याबरोबर तू का येतोस? तुझी आम्हास भीती वाटते.' तो प्राणी म्हणाला, 'मी तुझ्या मुलीचे नशीब. मी तिच्याबरोबर नाही जाणार, तर कोणाच्या? तू बुड्ढी झालीस. तुझ्या नशिबाचे सारे खेळ संपले. आता मुलीच्या नशिबाचे खेळ सुरू होतील.'

ती म्हातारी म्हणाली, 'माझ्या मुलीच्या नशिबी काय आहे? कशी सोन्यासारखी पोर आहे; परंतु आम्ही पडलो गरीब. राजाला राणी शोभेल अशी आहे माझी मुलगी; परंतु काय तिच्या नशिबी आहे कोणास कळे? माझ्यासारख्या भिकारणीच्या पोटी तिने जन्म घेतला, म्हणून हे हाल. तिचे पाय फुलाहून कोवळे आहेत, प्राजक्ताच्या फुलाहून नाजुक आहेत; परंतु अनवाणी चालावे लागते. ते पाहा तिचे पाय सोलून निघाले आहेत.' तो प्राणी म्हणाला, 'म्हाताऱ्ये, उगीच ऐट कशाला सांगतेस? तुझ्या मुलीचे नशीब वाईट आहे. तिचे प्रेताजवळ लग्न लागणार आहे!'

ते शब्द ऐकून म्हातारी धाडकन् खाली पडली. तो प्राणी दिसेनासा झाला. ती मुलगी धीराची होती. तिने पळसाच्या पानांचा द्रोण करून पाणी आणले. आईच्या डोळ्यांना लावले. झाडाच्या पानांनी ती वारा घालीत बसली. म्हातारीने डोळे उघडले. 'पोरी, कसे ग तुझे होणार? असा ग कसा देव!' असे म्हणून म्हातारी लहान मुलाप्रमाणे रडू लागली. ती शहाणी मुलगी आईला धीर देऊन म्हणाली, 'आई, ऊठ. देव करतो ते सारे बऱ्यासाठी. त्याचा हेतू चांगलाच असतो. तो विष देवो, अमृत देवो; पाऊस देवो, ऊन देवो; सर्व आपल्या कल्याणासाठीच असते. देवाच्या दयेबद्दल शंका का घ्यावी? ती बघ झाडे हलत

आहेत, तुला वारा घालीत आहेत. देवाचे हातच जणू तुला विंझणे वारीत आहेत. ऊठ आई.'

आईचा हात धरून ती धीराची मुलगी चालू लागली. होता होता सायंकाळ झाली. राजाची राजधानी दिसत होती. आईचा हात धरून मुलगी चालत होती. आता अंधार पडला. आईला तहान लागली होती. आता रात्री पाणी कोठे मिळणार? कोठे शोधणार? परंतु फुलांचा वास येत होता. जवळपास बाग असावी असे त्या मुलीला वाटले. ती आईला म्हणाली, 'आई, तू येथे बैस. कोठे तरी जवळच बाग असावी. फुलांचा वास येत आहे. रातराणीचा, निशिगंधाचा, प्राजक्ताच्या कळ्यांचा वास येत आहे.' असे म्हणून ती मुलगी पाणी शोधावयास निघाली.

ती प्रधानाच्या मुलाची गावाबाहेरची बाग होती. केवढी थोरली अफाट बाग होती. एकदा आत मनुष्य शिरला की बाहेर निघणे कठीण. रात्रीच्या वेळी कोणी अनोळखी नवखा मनुष्य बागेत शिरला तर तो बाहेर पडणे शक्य होत नसे. उजाडले म्हणजे तो बाहेर पडे. ती मुलगी त्या बागेत शिरली. पाणी शोधीत चालली. शेवटी एका कारंजाजवळ आली. रात्रीची वेळ होती. कर्दळीची पाने तिने तोडली, परंतु त्या झोपलेल्या पानांना तोडण्याआधी तिने नमस्कार केला व क्षमा मागितली. त्या पानांचा द्रोण करून तो पाण्याने भरून घेतला व ती निघाली. परंतु तिला रस्ता सापडेना. तिला बागेतून बाहेर पडता येईना. घुटमळत राहिली, हिंडत राहिली. 'माझी आई तहानेली असेल, पाणी पाणी म्हणून प्राण सोडील' असे म्हणून ती रडे व भिरीभिरी हिंडे, परंतु रस्ता सापडेना.

आता बरीच रात्र झाली होती. प्रधानाचा मुलगा गावाला गेला होता. आज राजपुत्र एकटाच होता. तो रात्री जिवंत झाला व बागेत हिंडू लागला. हिंडता हिंडता त्या मुलीची व त्याची गाठ पडली. ती दोघे एकमेकांकडे पाहात राहिली. "माझी आई' एवढा एकच शब्द तिच्या तोंडातून बाहेर पडला. त्या राजपुत्राने सारी चौकशी केली. तो म्हणाला, 'चल, मी तुला रस्ता दाखवतो.' किती तरी दिवसांत राजपुत्र बागेच्या बाहेर पडला नव्हता. दोघेजण बागेच्या बाहेर आली व आईला शोधीत फिरू लागली. सापडली एकदाची आई.

'आई, हे पाहा पाणी, आई –' तिने हाक मारली. आईचे डोके तिने मांडीवर घेतले. आईने डोळे उघडले. 'बाळ, माझा प्राण वाचत नाही. घाल शेवटचे

पाणी. तुझ्या हातची गंगा. तुझ कसे होईल?' असे म्हणून म्हातारी मांडीवर पडली. तो राजपुत्र म्हणाला, 'तुमच्या मुलीची काळजी करू नका. मी राजपुत्र आहे. मी तिला माझी बायको करीन. आमचे हात एकमेकांच्या हातांत द्या व आम्हा दोघांस आशीर्वाद द्या.'

म्हातारीने थंडगार होत जाणाऱ्या हातांनी आपल्या मुलीचा हात राजपुत्राच्या हातात दिला. झाडावरून फुले डोक्यावर पडली. म्हातारीने दोघांच्या डोक्यावर ते सुकलेले परंतु प्रेमाने भरलेले हात ठेवले व म्हणाली, 'देव तुम्हाला उदंड आयुष्य देवो! मुलेबाळे देवो! सुखात ठेवो! एकमेकांस अंतर देऊ नका. कसेही दिवस येवोत, देवाला विसरू नका, उतू नका, मातू नका; कोणाचे वाईट करू नका, वाईट चिंतू नका. कोणाचा हेवादावा नको, मत्सर नको. मी आणखी काय सांगू? माझ्याने बोलवत नाही. आता देवाचे नाव घेत सुखाने मरू दे.' असे म्हणून ती 'राम, राम' म्हणू लागली.

म्हातारीचा प्राण गेला. त्या दोघांनी तो मृत देह बागेत नेला व त्याला अग्नी दिला. दोघेजण दमली होती. ती मुलगी रडत होती. राजपुत्र तिचे सांत्वन करीत होता. हातपाय धुवून दोघे त्या घरात आली. राजपुत्राने तिला खाण्याचा थोडा आग्रह केला. तिने दोन फळे खाल्ली. नंतर राजपुत्राने तिला सारी हकीगत सांगितली, 'मी सकाळी मरून पडेन, परंतु रात्री जागा होईन. काही काळजी करू नकोस. शेवटी चांगले होईल.' असे म्हणाला.

आपल्या नशिबी काय आहे ते तिला आठवले. 'प्रेताशी लग्न लागणार' हे शब्द तिला आठवले. काय काय होईल ते खरे. आईने हात हातांत दिला, आता यांचे पाय सोडून जावयाचे नाही, आता जन्माच्या गाठी पडल्या;' असे ती मनात म्हणाली.

सकाळी नित्याप्रमाणे राजपुत्र मरून पडला, त्याच्याजवळ ती मुलगी, ती त्याची पत्नी बसून राहिली. ती त्याच्या अंगावर माशी बसू देत नसे. वारा घाली. दिवसभर तिने खाल्ले नाही. रामनामाचा जप करीत पतीजवळ बसून राहिली. रात्रीची वेळ झाली. तिकडे त्या सावत्र राणीची झोपायची वेळ झाली. तिने सोन्याची साखळी गळ्यातून काढून उशीखाली ठेवताच, इकडे राजपुत्र जागा झाला. तो जागा होताच त्या मुलीच्या जिवात जीव आला. दोघांना आनंद झाला. दोघांनी हौदावर जाऊन स्नान केले. त्या बागेत एक शिवालय

होते. 'चला, तेथे जाऊन आपण पूजा करू. रोज रात्री आपण त्या मृत्युंजयाची पूजा करीत जाऊ.' असे ती त्याला म्हणाली. दोघांनी महादेवाची पूजा केली. घरात जाऊन दोघांनी फलाहार केला. राजपुत्र म्हणाला, 'तू दिवसा खात जा, असा उपवास करू नकोस.' ती म्हणाली, 'तुमच्याशिवाय मी कशी खाऊ? सीता, सावित्री, द्रौपदी, दमयंती, यांच्या कथा मी उगाच का ऐकल्या? असे मला कसे सांगता? स्त्रियांचे हृदय तुम्ही ओळखीत नाही का? तुमच्याशिवाय जेवणे म्हणजे ते विष आहे. त्यात मला आनंद नाही. दिवसा तुमच्याजवळ 'राम राम' म्हणत बसणे तेच खरे आपणा दोघांना जेवण.' आपल्या पत्नीचे ते थोर शब्द ऐकून राजपुत्राला कृतार्थ वाटले. आपल्याला देवाने फार थोर मनाची पत्नी दिली म्हणून त्याने देवाचे आभार मानले.

प्रधानाचा मुलगा गावाहून आला. आपल्या मित्राला भेटण्यासाठी तो रात्री आला. तो येऊन पाहातो तो बागेत राजपुत्र कोणा स्त्रीबरोबर हिंडत आहे! त्याला आश्चर्य वाटले. राजपुत्राने त्याला सारी कथा सांगितली. प्रधानाच्या मुलास आनंद झाला. तो म्हणाला, 'आता मी जरी गावाला गेलो तरी तू एकटा राहाणार नाहीस. वहिनींना दुपारी जेवायला पाठवीत जाईन.' ती थोर मुलगी म्हणाली, 'भावोजी, मी दिवसा खाणार नाही. रोज रात्री बरोबरच आम्ही पारणे सोडीत जाऊ. तुम्ही येथेच स्वयंपाकाचे आणून ठेवा. लाकूडफाटे आणून ठेवा. मी माझ्या हाताने रसोई करीन. माझ्या हाताने यांना वाढीन, त्यात खरा आनंद आहे. काही तरी सेवा मला घडू दे.'

प्रधानाच्या मुलाने त्याप्रमाणे सारी व्यवस्था केली. बाहेर रात्र पडली म्हणजे ती मुलगी चूल पेटवी व उत्कृष्ट स्वयंपाक करून ठेवी. आपला पतिदेव केव्हा जागा होईल, त्याला आपण नैवेद्य केव्हा दाखवू, याची ती वाट पाहात बसे. तो उठला म्हणजे उभयता स्नान करीत. देवाची पूजा करीत व केळीच्या पानावर जेवत. जेवण झाल्यावर ती भांडी घाशी व राजपुत्र विसळू लागे. ती नको नको म्हणे, परंतु तो ऐकत नसे. एकमेकांना मदत करावी असे तो म्हणे.

असे कित्येक दिवस गेले. त्या बागेत राजपुत्राला एक मुलगा झाला. दिवसा मुलाला खेळवण्यात त्याच्या पत्नीचा आता वेळ जाई. तेथे एक सुंदर पाळणा टांगला होता. रात्री राजपुत्र मुलाला खेळवी, नाचवी. परंतु असे या बागेत किती दिवस रहावयाचे? राजाला या गोष्टी माहीत नव्हत्या. प्रधानाच्या

मुलाशिवाय कोणालाही हे रहस्य माहीत नव्हते. या रहस्याचा उलगडा कसा व्हावयाचा ?

प्रधानाचा मुलगा स्वस्थ बसला नव्हता. त्याने कित्येक दासींना त्या सावत्र राणीच्या हालचालींवर लक्ष ठेवण्यास सांगितले होते. एक दिवस सावत्र राणीला जरा बरे वाटत नव्हते. रात्री एक दासी डोके चेपीत बसली होती. राणीला झोप येईना. शेवटी तिला एकदम आठवण झाली.

'खरेच, आज साखळी काढून ठेवली नाही.' असे म्हणून तिने गळ्यातील ती सोन्याची साखळी उशीखाली काढून ठेवली. दासीने विचारले, 'काढूनशी ठेवलीत ?' राणी म्हणाली, 'ती काढून ठेवली नाही तर ती बोचते व झोप येत नाही. मी रोज ती काढून ठेवते. उशीखाली ठेवते. एक क्षणभरही या साखळीला मी विसंबत नाही.'

दासीला ती गोष्ट महत्त्वाची वाटली. तिने ती गोष्ट प्रधानाच्या मुलास सांगितली. प्रधानाच्या मुलाच्या सर्व गोष्टी लक्षात आल्या. राजपुत्राने ज्या सोन्याच्या साखळीबद्दल सांगितले, तीच ही याबद्दल त्याला शंका राहिली नाही. ती सोन्याची साखळी कशी मिळवावी ते त्याला समजेना.

प्रधानपुत्राने ती गोष्ट राजपुत्र व त्याची बायको यांना सांगितली. राजपुत्राच्या बायकोने धांडस करावयाचे ठरविले. आपल्या पतीचे प्राण कायमचे आपणच परत आणावे असे तिने नक्की केले.

सकाळची वेळ होती. राजपुत्राच्या बायकोने आपले पहिले फाटके लुगडे काढले. ती ते नेसली. भिकारणीच्या वेषाने आपल्या मुलास कडेवर घेऊन ती निघाली. तिचे रूप राणीला लाजवील असे होते; परंतु तिची वस्त्रे भिकारणीला शोभतील अशी होती. हिंडता हिंडता ती राजवाड्यात आली. सावत्र राणी अंगणात होती. ती भिकारीण राणीला म्हणाली, 'राणी, राणी, मला नाही कोणी. मला उद्योगधंदा द्या, मी गरीब आहे. तुम्ही सांगाल ते काम करीन. मी तुमचे केस विंचरून देईन. हलक्या हाताने वेणी घालीन.' राणीला आश्चर्य वाटले. त्या भिकारणीचे रूप पाहून तिला तिचा मत्सर वाटला. अशी सुंदर स्त्री आपली दासी असावी असे तिने ठरविले.

'त्या पाण्याने हातपाय धुवून ये व माझे केस विंचर बघू.' असे सावत्र राणी म्हणाली. त्या वेषधारी भिकारणीने तसे केले. हलक्या हाताने ती राणीचे केस

विंचरू लागली. एक केस तडतडला नाही. इतक्यात मुलगा रडू लागला. कोण रडते म्हणून दुसरी राणी पाहावयास आली. त्या राणीला पाहाताच सावत्र राणी म्हणाली, 'तुमचा मुलगा नाही आला. तो या जन्मी नाही यावयाचा. काय मेली आशा तरी! म्हणे माझा मुलगा येईल, माझा मुलगा येईल!'

त्या भिकारणीला राजपुत्राची खरी आई कोण हे लगेच समजले. आपल्या पतीचा चेहरा व त्या राणीचा चेहरा यांत तिला साम्य दिसू लागले. आपल्या सासूच्या पाया पडावे असे तिला वाटले; परंतु तिने धीर धरला. ती राणी त्या रडणाऱ्या मुलाजवळ आली व म्हणाली, 'किती गोड मुलगा आहे! माझा बाळ देखील लहानपणी असा दिसे; परंतु दैवाला नाही पाहावले. देव मला मेलीला नेता तर! परंतु सोन्यासारखी मुले नेतो आणि आम्हाला रडायला ठेवतो! द्या, मी जरा घेत्ये त्याला.'

'काही नको घ्यायला. ती माझी दासी आहे आणि तूही खबरदार त्यांच्याजवळ बोलशील तर. तुला कामावर ठेवणार नाही.' सावत्र राणीचे शब्द ऐकून ती थोर राणी निघून गेली. ती वेषधारी भिकारीण मुलग्याला उगी करून 'उद्या येईन' असे सांगून गेली.

रात्री राजपुत्राला सारी वार्ता तिने सांगितली. लवकरच तुम्हाला मी मुक्त करीन असे ती म्हणाली.

तो मुलगा आता चारपाच वर्षांचा झाला होता. त्याला सर्व समजू लागले होते. एके दिवशी मुलाला आई म्हणाली, 'बाळ आज त्या राणीकडे आपण जाऊ, त्या वेळेस तेथे तू मोठ्याने रडू लाग. मी किती समजावले तरी उगी राहू नकोस. मी तुला विचारीन, 'का रे रडतोस?' तू राणीच्या गळ्यातील सोन्याच्या साखळीकडे बोट कर. ती सोन्याची साखळी मिळेल, तेव्हाच रडावयाचा थांब.'

मुलाला असे पढवून त्याला घेऊन रोजच्याप्रमाणे ती कामाला आली. सावत्र राणीची वेणीफणी ती करू लागली. जवळच बाळ खेळत होता. तो एकाएकी रडू लागला. राणी म्हणाली, 'त्याला आधी उगी कर. वेणीफणी मागून कर.' काही केल्या बाळ रडायचा थांबेना.

त्याची आई त्याला म्हणाली, 'का रे असा ओक्साबोक्शी रडतोस? काय झाले? काय हवे तरी?' मुलाने राणीच्या गळ्यातील साखळीकडे बोट केले.



राणी म्हणाली, 'लबाडा, सोन्याची साखळी हवी का? माझ्या पोटी का आला नाहीस? देव भिकाऱ्यांना खंडीभर पोरे देईल, परंतु श्रीमंताला देणार नाही.' त्या मुलाची आई त्याला म्हणाली, 'माझ्या पोटी कशाला आलास? पुढच्या जन्मी राजाराणीच्या-पोटी जन्म घे व सोन्यामोत्यांचे दागिने घाल, उगी.'

परंतु मुलाचे रडणे थांबेना. शेवटी राणीला त्या लेकराची कीव आली. 'घाल त्याच्या गळ्यात थोडा वेळ. जरा थांबला रडायचा म्हणजे निजेल. मग हळूच घे.' असे राणी म्हणाली. सोन्याची साखळी मिळताच बाळ रडायचा थांबला. आईच्या मांडीवर तो झोपी गेला. ती राजपुत्राची बायको राणीला म्हणाली, 'मी याला घरी निजवून येते. हळूच तुमची साखळी काढून आणून देते.' राणी म्हणाली, 'जा, परंतु साखळी लवकर घेऊन ये. ती साखळी माझा जीव की प्राण आहे. त्या साखळीला मी कधी विसंबत नाही. फक्त निजताना उशाखाली ठेवते. नाही तर अक्षयी गळ्यात असते.'

ती वेषधारी दासी मुलाला घेऊन गेली. ती निघाली आणि बागेत आली; तेथे येऊन पाहते तो राजपुत्र जिवंत झालेला. दोघांना फार आनंद झाला. मुलाच्या गळ्यातील सोन्याच्या साखळीकडे बोट करून ती म्हणाली, 'हा पाहा तुमचा

प्राण. हा मी परत आणला आहे.' राजपुत्र म्हणाला, 'आईने सांगितली होती, तीच ही साखळी.'

इतक्यात प्रधानाचा मुलगा पण तेथे आला. डाव सिद्धीस गेला हे पाहून त्याला धन्यता वाटली. तो म्हणाला, 'आता मी राजाला जाऊन सांगतो. तुम्हास हत्तीवरून मिरवीत नेऊ.'

प्रधानाचा मुलगा राजाकडे गेला. त्याने सारे वर्तमान सांगितले. राजाला आश्चर्य वाटले. केव्हा मुलाला, सुनेला, नातवाला पाहीन असे त्याला झाले. राजपुत्राच्या आईस कळले. राणी धावतच आली. ती म्हणाली, 'त्या लहान मुलास पाहून मला माझ्या मुलाची आठवण होई ती उगीच नसे होत. तो माझाच नातू. माझे हृदय मला सांगत असे. हृदयाचा सूर खोटा कसा ठरेल! चला, आपण त्याला डोळेभर पाहू. पोटाशी धरू.'

हा हा म्हणता बातमी शहरात पसरली. लाखो लोक निघाले. हत्ती, घोडे, रथ, चतुरंग सैन्य निघाले. हत्तीवर सोन्याची अंबारी ठेवली होती. वाद्ये वाजू लागली. राजा व राणी बागेजवळ आली. सून पाया पडली. त्यांनी तिला आशीर्वाद दिले. मुलगा भेटला. नातवाला जवळ घेऊन, त्याला आजीने कुरवाळले. राजाराणीचा आनंद गगनात मावेना. मिरवीत मिरवीत सारे राजवाड्यात आले. राजाने मोठा सोहळा केला. गरिबांना अन्नदान, वस्त्रदान झाले, जो जे मागेल ते त्याला मिळाले. सारे सुखी होते. एकच प्राणी दुःखी होता व तो म्हणजे ती सावत्र माता. राजा तिचे नाक कान कापून हाकलून देणार होता; परंतु राजाचा मुलगा उदार होता. त्याने तसे होऊ दिले नाही. 'दया करणे हाच थोर धर्म.' असे तो म्हणाला. तो सावत्र आईच्या पाया पडून म्हणाला. 'माझे प्राण तुझ्या गळ्यात होते. मी तुझ्या गळ्यातील ताईत. झाले गेले विसर व मजवर मुलाप्रमाणे प्रेम कर. मी माझ्या आईचा तसाच तुझा.' सावत्र आईचे हृदय भरून आले व ती म्हणाली, 'आजपासून मी तुझी खरी आई झाल्ये.'

**शेवट गोड झाला.**

**सर्वांना आनंद झाला.**

**तसा तुम्हा आम्हास होवो.**





खरा मित्र : कथा सहावी

# खरा मित्र



एक होता राजा. त्या राजाचा एक प्रधान होता. राजाला एक मुलगा होता व प्रधानाला एक होता. राजपुत्र व प्रधानपुत्र मोठे मित्र होते. लहानपणापासून ते एकत्र वाढले, एकत्र खेळले. त्यांचे एकमेकांवर फार प्रेम होते. प्रधानाच्या मुलाचे लग्न झाले होते. राजपुत्राचे अद्याप लग्न झाले नव्हते. राजा एके दिवशी त्या दोघांना म्हणाला, 'तुम्ही दोघे जा, जगभर हिंडा व राजपुत्राला अनुरूप वधू शोधून काढा.' प्रधानपुत्र म्हणाला, 'हो, आम्ही सर्व जगाची मुशाफिरी करतो.'

ते दोघे मित्र निघाले. दोघांनी दोन घोडे घेतले होते. घोडे देखणे असून चपळ होते. वाऱ्याप्रमाणे त्या घोड्यांचा वेग होता. घोड्यावर बसून दोघे जात होते. नद्यानाले, रानेवने, दरीखोरी, हिंडत ते चालले. कधी शहरे बघत तर कधी तपोवने बघत. कधी राजवाडे बघत तर कधी आश्रम. असे करीतकरीत ते खूप दूर गेले; परंतु राजपुत्राला योग्य अशी मुलगी त्यांना दिसली नाही.

एके दिवशी ते फार थकले होते. एका विस्तृत व विशाल तळ्याच्या काठी त्यांनी मुक्काम केला. तळ्याचे पाणी निर्मळ व रुचकर होते.

संध्याकाळ झाली होती. सूर्याचे शेवटचे किरणही गेले. आकाशात लाल रंग पसरला होता व त्याचे प्रतिबिंब पाण्यात पडले होते. फार सुंदर शोभा दिसत होती. त्यांनी घोड्यांना पाणी पाजले; त्यांना चारा घातला व झाडाशी बांधून ठेवले. दोघे मित्र घाटावर बसले होते. त्यांनी संध्या केली. नंतर त्यांनी फराळ केला. सुंदर गाणी म्हणत ते बसले होते. शेवटी दोघेजण झोपले.

इतक्यात एक प्रचंड आवाज आला. तळ्याच्या पाण्यातून तो आवाज येत होता. पाण्यावर कोणी काही तरी आपटीत असावे तसा तो आवाज होता. घोडे खिंकाळू लागले. त्या आवाजाने ते दोघे मित्र जागे झाले. पाहातात तो एक प्रचंड सर्प त्या तळ्यातून बाहेर येत होता. तो आपली फणा दाणदाण त्या पाण्यावर आपटीत होता. राजपुत्र व प्रधानपुत्र घाबरले. तो प्रचंड सर्प तळ्यातून बाहेर आला. त्या सर्पाच्या फणेवर मणी होता. तो मणी त्याने खाली टाकला. त्या मण्याचा प्रकाश सर्वत्र पडला होता. त्या प्रकाशात सर्प आपले भक्ष्य शोधू लागला. प्रधानपुत्र व राजपुत्र भीतीने झाडावर चढले. त्या सर्पाची दृष्टी त्या घोड्यांकडे वळली. सर्पाने ते दोन्ही घोडे खाऊन टाकले. झाडावर बसलेल्या त्या दोघा कुमारांना भीती वाटली. झाडावर चढून साप आपणास गिळंकृत करतो की काय असे त्यांस वाटले. परंतु साप अन्यत्र फणफणत गेला. इतक्यात प्रधानपुत्राला एक युक्ती सुचली. सापाच्या मण्यावर घोड्याची लीद टाकली तर त्या मण्याचे तेज नाहीसे होते, असे त्याने ऐकले होते. झाडाच्या खाली घोड्यांची लीद पडलेली होती. प्रधानपुत्र धीरे-धीरे खाली उतरला व त्याने तेथील लीद घेऊन त्या मण्यावर टाकली. लगेच आजूबाजूला अंधार पडला. प्रधानपुत्र पटकन् झाडावर चढला. तो सर्प रागारागाने फणा आपटीत होता. हळुहळू तो आवाज येतनासा झाला. सर्प तळ्यात गेला असावा असे त्या दोघा मित्रांस वाटले.

सकाळ झाली. दिशा फाकल्या. ते दोघे मित्र खाली उतरले. खाली उतरल्यावर थोड्या अंतरावर तो प्रचंड सर्प मरून पडला आहे असे त्यांना आढळून आले. त्यांना फार आनंद झाला. दोन उमदे घोडे मरण पावल्याबद्दल त्यांना फार वाईट वाटले. प्रधानपुत्र त्या मण्याजवळ गेला. त्याने तो मणी तळ्यावर धुण्यासाठी नेला. तो काय आश्चर्य! हातात मणी घेऊन पाण्यात उतरताच पाण्यातील सर्व दिसू लागले. त्या तळ्याच्या तळाशी त्यांना सुंदर बाग दिसली, मोठमोठे बंगले दिसले. त्या दोघांनी पाण्यात बुडी घेण्याचे ठरवले. परस्परांनी परस्परांचे हात धरले व हातात तो मणी धरला. त्यांना पाण्यात कसलीच अडचण झाली नाही. ते दोघे एकदम पाण्याच्या तळाशी आले. तेथे सुंदर बगीचा होता. फुलझाडे होती, फळझाडे होती. त्यांनी फळे खाल्ली, फुले तोडून वासासाठी घेतली. ते हिंडत हिंडत एका बंगल्याजवळ आले. तो एक

सुंदर राजवाडा होता. ते त्या राजवाड्यात शिरले. तेथे आत एका पलंगडीवर एक सुंदर मुलगी होती. ती दीन होती, केविलवाणी दिसत होती. ती त्या दोघा कुमारांना म्हणाली, 'तुम्ही येथे कशाला आलात? आता तुम्ही जिवंत राहाणार नाहीत. तो दुष्ट सर्प तुम्हास मारील. त्याने माझ्या घरची सर्व माणसे मारली व मला अभागिनीला मात्र जिवंत ठेवले. तो रोज मला छळतो. धड जगू देत नाही, मरू देत नाही. तुम्ही परत जा.'

राजपुत्र म्हणाला, ' तो सर्प तर वर मरून पडला आहे. हा पाहा त्याच्या डोक्यावरचा मणी. तुम्हाला भय नको. तुम्ही आमच्याबरोबर चला.' प्रधानाचा मुलगा म्हणाला, 'राजपुत्रासाठी - या माझ्या मित्रासाठी योग्य अशी वधू पाहावयास आम्ही जात होतो. तुम्हीच योग्य दिसता. राजपुत्र तुम्हाला पसंत असेल, तर तुम्हा दोघांचा मी विवाह लावतो.'

ती दोघे लाजली. मुकेपणाने त्यांनी संमती दिली. प्रधानपुत्राने हार तयार केले. त्याने त्यांचा विवाह लावला. राजपुत्र म्हणाला, 'चला, आता घरी जाऊ.' प्रधानपुत्र म्हणाला, 'आधी मी एकटाच घरी जातो. घराहून लवाजमा घेऊन येतो. हत्ती, घोडे, वाजंत्री घेऊन येतो. राजपुत्राने असे एकटे अनवाणी जाणे बरे नव्हे. ते शोभत नाही.' राजपुत्राला ते म्हणणे पटले. प्रधानपुत्राने जावे असे ठरले. दोघे मित्र हातात मणी घेऊन तळ्याच्या बाहेर आले. एकमेकांस सोडताना त्यांना वाईट वाटले. प्रधानपुत्र म्हणाला, 'मी बरोबर एक महिन्याने येथे येईन. त्या दिवशी येथे तू वर ये. मी तुझी वाट पाहीन. तो दिवस विसरू नकोस.'

प्रधानपुत्र निरोप घेऊन गेला. राजपुत्र त्याच्याकडे बराच वेळ पाहात होता. तो दिसेनासा झाल्यावर राजपुत्र पुन्हा खाली गेला. तेथे दोघेजणे राहिली. फळे खावयास भरपूर होती. तेथे कसला तोटा नव्हता. दुपारी फलाहार झाला म्हणजे राजपुत्र थोडी वामकुक्षी करी. त्या मुलीच्या मनात आले की तो मणी हातात घेऊन आपण वर जावे. बाहेरचे जग पाहावे. किती तरी दिवसांत ती पाण्याच्या बाहेर गेली नव्हती. राजपुत्र झोपला होता. ती हळूच निघाली. तिने हातात मणी घेतला. एकदम ती पाण्याच्या वर आली. बाहेरचे आकाश, बाहेरची सृष्टी, पशुपक्षी, गाईगुरे सर्व पाहून तिला आनंद वाटला. राजपुत्राची उठावयाची वेळ झाली असेल असे मनात येऊन ती पुन्हा खाली गेली. राजपुत्र जागा झाला

नव्हता. आपण वर गेलो होतो हे राजपुत्राला कळू नये म्हणून ती जपत होती. राजपुत्र दुपारी झोपला म्हणजे ती वर येई व बाहेरची हवा खाई.

एके दिवशी नेहमीप्रमाणे ती पाण्याच्या वर येत होती, इतक्यात तेथे तिला पुरुषाची चाहूल लागली. जवळच्या राजाचा मुलगा तेथे शिकारीस आला होता. तो राजपुत्र दृष्टीस पडताच ती मुलगी एकदम पाण्याखाली गेली. तो राजपुत्र तळ्याच्या काठावर येऊन उभा राहिला व सारखा बघत राहिला. पुन्हा ती मुलगी दिसावी म्हणून तो वाट पाहात होता. परंतु कोणी दिसले नाही. राजपुत्राच्या बरोबरचे शिपाई तेथे आले व म्हणाले, 'महाराज, आता घरी चलावे, राजेसाहेब वाट पाहात असतील.' परंतु राजपुत्र काही बोलेना, जागचा हलेना. त्या शिपायांना काय करावे ते कळेना. तो राजपुत्र म्हणाला, 'आता दिसली, नाहीशी झाली; आता दिसली, नाहीशी झाली.' त्याच्या म्हणण्याचा अर्थ त्या शिपायांस समजेना. कोणी म्हणाला, 'यांना पिशाच्चबाधा झाली.' कोणी म्हणे, 'वेड लागले.' कोणी म्हणाले, 'जलदेवतेचा कोप झाला.' शिपायांनी राजपुत्राला उचलून घोड्यावर घातले व त्याला घट्ट बांधले. शिपाई राजपुत्राला घेऊन राजवाड्यात आले. शिपाई राजाला म्हणाले, 'महाराज, यांना कसली तरी बाधा झाली आहे. तळ्याच्या काठी उभे होते व 'आता दिसली, नाहीशी झाली.' एवढेच हे सारखे म्हणतात.' असे म्हणून शिपाई निघून गेले.

राजाला हा एक मुलगा होता व एक मुलगी होती. गादीचा मालक राजाच्या नंतर हाच होता. एकुलता एक मुलगा - आणि त्याला वेड लागले! राजा दुःखी झाला. गावोगावचे वैद्य आले, हकीम आले; परंतु उपाय चालेना. मांत्रिक आले, तांत्रिक आले; परंतु कशाने गुण पडेना. राजाने आपल्या राज्यात दवंडी दिली, 'जो कुणी माझा मुलगा बरा करील, त्याला माझे अर्धे राज्य व माझी मुलगी देईन.' अनेकांनी प्रयत्न केले; परंतु कोणास यश येईना.

त्या गावात एक म्हातारी होती. ज्या वेळेस राजपुत्र त्या तळ्याच्या काठी आला होता त्या वेळेस ती म्हातारी जवळच होती. ती वाळलेल्या काटक्याकुटक्या जळणासाठी गोळा करीत होती. राजपुत्राचे वेड तिला माहीत होते. ती पाण्यातून वर येणारी मुलगी हे त्या वेडाचे कारण होते. म्हातारीने ती मुलगी वर आलेली पूर्वीही पाहिली होती, तिच्या मनात आले की आपण ती मुलगी फसवून आणू व राजाचे बक्षीस जिंकू.

ती म्हातारी राजाकडे आली. आधी तिची दाद लागेना; परंतु एकदाची दाद लागली. ती राजाला म्हणाली, 'राजा, तुझ्या मुलाचा रोग मी बरा करीन; परंतु जर तुझा मुलगा बरा झाला तर तुझी मुलगी माझ्या मुलास तू दिली पाहिजेस. अर्धे राज्य तर देशीलच. कबूल असेल तर सांग.' राजा म्हणाला, 'मला मान्य आहे. काही करा, परंतु मुलाला शुद्धीवर आणा.' ती म्हातारी पुन्हा म्हणाली, 'त्या तळ्याच्या काठी मला एक झोपडी बांधून दे. त्या तळ्यापासून ५० कदमांवर नेहमी दहा शिपाई लपलेले असावेत, मी टाळी वाजवताच त्यांनी धावून यावे. ही व्यवस्था झाली पाहिजे.' राजा म्हणाला, 'तसा हुकूम आताच देतो. सर्व काही करतो, परंतु मुलगा बरा करा.'
म्हातारीने सांगितले तशी सारी व्यवस्था झाली. त्या तळ्याकाठच्या झोपडीत म्हातारी राहू लागली. एके दिवशी ती मुलगी पुन्हा पाण्यावर येऊन घाटावर बसली. इतक्यात म्हातारी तेथे आली. बाईमाणूसच आहे, असे पाहून ती मुलगी पाण्यात पळून गेली नाही. ती बाहेर आली. म्हातारी त्या मुलीजवळ आली. म्हातारी वात्सल्याने म्हणाली,'ये मुली, तुझी वेणी घालते. केस विंचरते. उद्या येताना फुले घेऊन ये. त्यांचा गजरा तुझ्या केसांत घालीन.' म्हातारी जणू आपली आई असे मुलीला वाटले. तिला आईची आठवण आली व तिच्या डोळ्यांतून पाणी आले. 'का ग मुली, का रडतेस? तुला काय दुःख आहे, कोणता त्रास आहे?' म्हातारीने विचारले. मुलगी म्हणाली, 'त्रास आता नाही; परंतु आईची आठवण आली व डोळे भरून आले. असो. मी आता जाते. उद्या येईन.' असे म्हणून मुलगी खाली गेली.

मुलीचा विश्वास म्हातारीने चांगलाच संपादन केला. मुलगी रोज येई व म्हातारीजवळ बसे. एक दिवस ती लबाड म्हातारी तिला म्हणाली, 'मुली, तुला किती दिवस विचारीन विचारीन म्हणत होत्ये, परंतु रोज विसरच पडतो. आज बरी आठवण झाली. तू पाण्यातून वर कशी येतेस? ओली कशी होत नाहीस? खाली कशी जातेस? जणू जिना चढून येतेस, जिना उतरून जातेस. काय युक्ती आहे?' ती भोळी मुलगी म्हणाली, 'हा माझ्याजवळ मणी आहे. हा हातात असला म्हणजे सारे शक्य होते.' म्हातारी म्हणाली, 'पाहू दे तरी. चमत्कारच आहे. एवढे का या मण्याचे सामर्थ्य? जे जे ऐकावे ते ते थोडेच बाई.' असे म्हणून म्हातारीने तो मणी आपल्या हातात घेतला व आपल्या

निऱ्यांत लपविला. म्हातारीने मोठ्याने टाळी वाजविली; तत्क्षणी ते दहा शिपाई यमदूतांप्रमाणे धावत आले. म्हातारी म्हणाली, 'पकडा हिला; घाला घोड्यावर व राजाकडे घेऊन चला.'

त्या शिपायांनी मुलीला घोड्यावर बांधले. तिच्या ओरडण्याकडे कोणाचेही लक्ष नव्हते. पाठोपाठ म्हातारीही आली. राजवाड्यासमोर ही गर्दी. राजपुत्राच्या नजरेस ती मुलगी पडताच 'हो, हीच होती. हीच दिसली. पाण्यावर दिसली व नाहीशी झाली. तू आता माझी हो. बाबा, हिच्याबरोबर माझे लग्न लावा.' ती मुलगी म्हणाली, 'माझे लग्न लागलेले आहे. असा अन्याय कसा करता? मी परस्त्री आहे. हे पाप करू नका. निदान सहा महिने तरी वाट पाहा. सहा महिन्यांत माझा पती आला नाही तर मग पाहू.' राजपुत्राला तेवढीच आशा वाटली. सहा महिने हा हा म्हणता जातील असे त्याला वाटले. राजपुत्राचे वेड गेले. म्हातारीने पैज जिंकली.

त्या म्हातारीचा मुलगा वेडगळ होता. त्याला बोलता येत नसे. दोनच शब्द तो बोलत असे. त्याला 'होय' म्हणावयाचे असे, तेव्हा तो 'बम् बम् बम्' असे म्हणे; त्याला 'नाही' म्हणावयाचे असे, तेव्हा 'धूपु धूपु धूपु' असे म्हणे. तो कपडा अंगावर घालीत नसे. तो झाडांचे टाळे जमवी व ते कमरेभोवती बांधी. अंगाला भस्म चोपडी. फक्त एक लंगोटी नेसत असे. असे ते वेडबंबूचे ध्यान होते. तो बहुधा घरी कधी नसे. सठी सहामासी एखादे वेळेस येई. म्हातारी रोज मुलाची वाट पाहात होती. माझा वेडगळ मुलगा राजाचा जावई होणार असे ती ऐटीने सर्वांस सांगत होती, परंतु मुलगा घरी येईना.

इकडे राजपुत्र पाण्यात अडकला. ती मुलगी नाही व तो मणीही नाही. आपली पत्नी आपणास फसवून कशी गेली? कोणी हे कपट केले? कोणी दुष्टावा केला? प्रधानाच्या मुलाचे तर काही नसेल यात अंग? नाना संशय तो घेऊ लागला. पाण्यात तो तडफडत होता. तेथली फळे त्याला रुचत ना, फुले आवडत ना. तो अशक्त व फिकट दिसू लागला.

ठरलेल्या दिवशी प्रधानाचा मुलगा मोठा लवाजमा घेऊन आला. शृंगारलेले हत्ती, शृंगारलेले घोडे घेऊन तो आला. चौघडा वाजत होता. वाजंत्री वाजत होती. बार उडत होते, अब्दागीर फडकत होता. प्रधानाचा मुलगा तळ्याच्या घाटावर वाट पाहात होता; परंतु सायंकाळ होत आली, तरी कोणी वर आले

नाही. सर्वांना काळजी वाटू लागली. एक दिवस गेला. दुसरा दिवस गेला; परंतु राजपुत्र वर येईना. चार दिवस झाले. तरी काही नाही. किती दिवस असे पडून राहावयाचे? जवळचे खाणेपिणे संपले. राजाही घरी काळजी करीत असेल. सारी परिस्थिती लक्षात घेऊन प्रधानाचा मुलगा सर्वांस म्हणाला, 'तुम्ही घरी जा. राजपुत्र मला भेटेल, तेव्हाच मी घरी येईन. हे तोंड एरवी दाखवणार नाही.' सर्व मंडळी उत्साहाने आलेली, परंतु निराशेने माघारी गेली.

प्रधानाचा मुलगा विवंचनेत पडला. काय करावे, कोठे जावे, त्याला उमज पडेना. आजूबाजूची गावे हिंडू लागला. जेथे पाय नेतील तिकडे जात होता. होता होता त्या राजाच्या राज्यात शिरला. त्या राज्यात जिकडे तिकडे आनंदी आनंद होता. तो लोकांना विचारी, 'एवढा उत्सव का?' लोक म्हणत, 'राजपुत्राचे वेड गेले. त्या तळ्यातील मुलगी त्याला मिळाली. चार दिवसांनी त्यांचे लग्न आहे.' प्रधानाचा मुलगा चमकला. तो तडक राजधानीस आला. तेथे तो आणखी माहिती मिळवू लागला. त्या म्हातारीजवळ मणी आहे व तिने त्या मुलीस फसवून आणले वगैरे वार्ता त्याला मिळाली. तो लोकांना विचारी, 'त्या म्हातारीचा मुलगा दिसावयाला कसा आहे? तो कसा बोलतो? तो कसा चालतो?' लोक त्याला म्हणाले, 'तो नाकीडोळी तुमच्यासारखाच आहे. तुमच्याच वयाचा, तुमच्याच उंचीचा. तो पाने कमरेभोवती गुंडाळतो. बम् बम् बम्, धूपू धूपू धूपू म्हणतो.' लोकांनी सर्व माहिती दिली. प्रधानाच्या मुलाने धाडस करावयाचे ठरविले, त्या म्हातारीचा मुलगा होण्याचे ठरविले. तो गावाबाहेर गेला. त्याने सारे कपडे काढले. एक लंगोटी लावली. कमरेभोवती पाने बांधली. अंगाला भस्म फासले. बम् बम् बम्, धूपू धूपू धूपू करीत तो गावात शिरला.

रात्र पडू लागली होती. तो प्रधानपुत्र त्या वेडगळ मुलाचे सोंग घेऊन म्हातारीच्या घरी आला. 'बम् बम् बम्, धूपू धूपू धूपू' शब्द ऐकून म्हातारीस आनंद झाला. ती एकदम बाहेर आली. मुलाचा हात धरून त्याला तिने घरात आणले. आज मुलगा साळसूदपणे घरात आला हे पाहून तिला आश्चर्य वाटले. आपला मुलगा निवळला असे तिला वाटले. ती मुलाला प्रश्न विचारू लागली,

'बाळ, तुला लग्न करायचे का?'

'बम् बम् बम्.'

'बाळ, राजाची मुलगी तुला बायको हवी का?'

'बम् बम् बम्.'

'बाळ, माझ्याजवळ मणी आहे तो तुला हवा का?'

'बम् बम् बम्.'

त्या वेषधारी प्रधानपुत्राने तो मणी घेतला व आपल्या कमरेत लपविला. म्हातारीला मुलाची उत्तरे ऐकून आनंद झाला. पुन्हा ती विचारू लागली,

'ती राजकन्या, तुझी भावी पत्नी तुला पाहावयाची आहे का?'

'बम् बम् बम्.'

'मग राजवाड्यात येतोस का?'

'बम् बम् बम्.'

मुलाची राजवाड्यात येण्याची तयारी आहे असे पाहून म्हातारी हर्षली. ती म्हणाली, 'चल माझ्याबरोबर. तू राजाचा जावई होशील. तुला अर्धे राज्य मिळेल. आता वेडेपणा सोडशील ना?'

'बम् बम् बम्.'

म्हातारी त्या वेषधारी प्रधानपुत्राला घेऊन राजवाड्यात आली. तिला राजवाड्यात जाण्यायेण्यास नेहमी सदर परवानगी होती. तिला मोठा मान होता. ती राजवाड्यात गेली व म्हणाली, 'माझा मुलगा आला आहे. त्याला राजकन्या पाहावयाची आहे. त्याचीच ती व्हावयाची आहे. त्याला बघू दे.' राजकन्या बाहेर आली व खाली मान घालून उभी राहिली. म्हातारी मुलास म्हणाली, 'तुला आवडली ना?' 'बम् बम् बम्.' तो म्हणाला. म्हातारी पुन्हा म्हणाली, 'आता घरी चल.' तो वेषधारी प्रधानपुत्र रागाने 'धूप् धूप् धूप्', म्हणाला.

'मग का येथे राहातोस?'

'बम् बम् बम्.'

'घरी येत नाहीस?'

'धूप् धूप् धूप्.'

शेवटी म्हातारी एकटीच घरी गेली. तो प्रधानपुत्र तेथेच बम् बम् बम् व धूप् धूप् धूप् म्हणत उभा राहिला. इतक्यात त्याने ती तळ्यातील मुलगी एका बाजूस रडताना पाहिली. तो एकदम तिच्याकडे धावून गेला व हळूच कानात म्हणाला, 'मी प्रधानाचा मुलगा. मी मणी मिळवला आहे. रात्री पळून जाऊ.'

इतक्यात शिपाई तेथे आले. 'अरे बेट्या, ती नव्हे तुझी बायको. ती तर राजपुत्राची आहे. चल इकडे ये.' तो वेषधारी वेडा तिकडे गेला.

रात्र होत चालली. पहारेकरी आलबेल देऊ लागले. तो प्रधानाचा मुलगा दरवाजापर्यंत जाई व परत येई. पहारेकरी म्हणाले, 'ही स्वारी असेच करणार. आयताच पहारा होईल. आपण जरा झोप घेतली तर हरकत नाही.' ती तळ्यातील मुलगी तयार होतीच. सारे पहारेकरी गाफील आहेत असे पाहून प्रधानपुत्राने त्या मुलीला एकदम खांद्यावर घेऊन तेथून पोबारा केला. झपझप पावले टाकीत तो गावाबाहेर आला. तेथे त्याचे कपडे एका झाडावर होते. त्याने आपले कपडे घातले. बाहेर अजून रात्र आहे तोच दोघेजण तळ्याच्या काठी आली. तो मणी होताच. दोघेजण पाण्याच्या तळाशी आली. बंगल्यात राजपुत्र प्रार्थना करीत होता. संकटात देवाशिवाय कोणाची आठवण येणार? ज्याची संकटात आठवण येते, तोच आपला खरा साहाय्यदाता. ती मुलगी राजपुत्राच्या पाया पडली. राजपुत्राने डोळे उघडले तो समोर त्याची पत्नी व मित्र! सर्वांना आनंद झाला. त्या मुलीने सर्व वार्ता सांगितली. आपण दुपारच्या वेळी बाहेर येत असू, त्याचा हा परिणाम असे म्हणून ती रडू लागली. राजपुत्राची तिने क्षमा मागितली.

सर्वांनी फलाहार केला. प्रधानपुत्र म्हणाला, 'आताच आपण निघू या. लवाजमा वगैरे काही नको. नाही तर आणखी संकटे येतील.' बाहेर पडावयाचे ठरले. सूर्य वर येत होता आणि ही तिघे पाण्यातून वर येत होती. जणू पाण्यातून तीन कमळेच वर आली!

तिघे पायी चालू लागली. त्या मुलीला पायी चालण्याची सवय नव्हती. तिचे पाय सुजले. तरी ती चालतच होती. सायंकाळ झाली म्हणजे मुक्काम करीत. प्रधानाचा मुलगा झोपत नसे. तो पहारा करी. एके दिवशी असाच एका रानात रात्रीचा मुक्काम पडला. राजपुत्र व त्याची पत्नी झोपली होती. प्रधानपुत्र जागा होता. इतक्यात त्याला पाखरांची मनुष्यवाणी ऐकू आली. झाडावर घरट्यात नर मादीजवळ बोलत होता. प्रधानपुत्र ऐकू लागला.

'हे बघ, या प्रधानपुत्राने, राजपुत्राचे प्राण किती जरी वाचवले तरी राजपुत्र लवकरच मरणार यात शंकाच नाही.' नर म्हणाला.

'ते कसे काय?' मादीने विचारले.

'राजपुत्र पत्नीसह व मित्रासह येत आहे ही वार्ता राजाच्या कानावर गेली आहे व राजाने हत्ती, घोडे शृंगारून पाठवले आहेत. हत्ती प्रधानपुत्रासाठी व घोडा राजपुत्रासाठी शृंगारला आहे. राजपुत्र घोड्यावर बसेल व घोडा पडेल आणि राजपुत्र मरेल.' नर म्हणाला.

'परंतु जर त्या घोड्यावर राजपुत्राला बसू दिले नाही तर तो वाचेल की नाही?' मादीने विचारले.

'हो, तर वाचेल; परंतु पुढे मरण ठेवलेलेच आहे.' नर म्हणाला.

'ते कसे काय?' मादीने विचारले.

'शहरात दरवाजातून आत शिरू लागताच, दरवाजा अंगावर कोसळेल व राजपुत्र मरेल.' नर म्हणाला.

'परंतु समजा तो दरवाजा आधी पाडून मग शहरात शिरला तर वाचेल की नाही?' मादीने विचारले.

'हो, तर वाचेल; परंतु पुढे मरण आहेच. ते टळत नाही. राजपुत्राच्या हात धुवून ते पाठीस लागले आहे.' नर म्हणाला.

'आणखी कोणते मरण? सांगा तरी.' मादी म्हणाली.

'अग, राजपुत्राच्या विवाहासाठी राजा मोठी मेजवानी देइल. राजपुत्राचे पहिले पान असेल. त्या पानात उत्कृष्ट तळलेला एक मासा असेल. राजपुत्र तो खाऊ लागेल. खाऊ लागताच तो मासा घशात अडकून राजपुत्राचे प्राण जातील.' नर म्हणाला.

'परंतु समजा, तो मासा कोणी काढून घेतला व राजपुत्राला खाऊ दिला नाही, तर तो वाचेल की नाही?' मादीने विचारले.

'तर वाचेल. परंतु आणखी एक मरण आहे.' नर म्हणाला.

'कोणते ते?' मादीने विचारले.

'राजपुत्र राजधानीत गेल्यावर रात्री झोपला, म्हणजे एक सर्प खोलीत येईल व तो डसेल.' नर म्हणाला.

'परंतु कोणी लपून राहून तो सर्प येताच ठार केला तर?' मादीने विचारले.

'तर तो वाचेल. या संकटातून वाचला तर तो शतायुषी होईल, मोठा राजा होईल. चला आता झोपू. हे आमचे बोलणे जर कोणी ऐकले असेल तर त्याने कोणाला सांगू नये. जर तो सांगेल तर तो दगड होऊन पडेल.' नर म्हणाला.

मादी म्हणाली, ‘तो जर दगड होऊन पडला, तर त्याचा पुन्हा मनुष्य व्हावयास काही उपाय नाही का?’

नर म्हणाला, ‘एकच उपाय आहे. ज्याला हे बोलणे सांगेल त्याच्या पहिल्या मुलाला ठार मारून त्याच्या रक्ताने जर त्या दगडाला कोणी स्नान घालील तर दगड पुन्हा सजीव होईल. तो मनुष्य जिवंत होईल. चला आता निजू.’

प्रधानाचा पुत्र हा सारा संवाद ऐकत होता, आपल्या मित्रावरची संकटे आधी कळली म्हणून त्याला आनंद झाला. सकाळ झाली. राजपुत्र व त्याची पत्नी उठली. मुखमार्जन करून तिघे चालू लागली. दुरून वाद्यांचा ध्वनी कानी येऊ लागला.

‘हा कशाचा आवाज?’ राजपुत्राने विचारले.

‘राजाने लवाजमा पाठविला आहे. हत्तीघोडे येत आहेत. त्याची वाद्ये वाजत आहेत.’ प्रधानपुत्र म्हणाला.

‘बाबांना वार्ता कोणी दिली?’ राजपुत्र म्हणाला.

‘पाखरांनी, वाऱ्याने, ताऱ्यांनी.’ प्रधानपुत्र म्हणाला.

‘हृदयातील देवतेने.’ राजपुत्राची पत्नी म्हणाली.

बोलत बोलत तिघे जात होती. इतक्यात समोरून घोडे, हत्ती येताना दिसले. शिपाई पुढे धावत आले. मुजरे झाले. राजपुत्रासाठी एक श्यामवर्ण वारू मुद्दाम शृंगारला होता. राजपुत्र त्याच्यावर बसणार, इतक्यात प्रधानपुत्र पुढे झाला व म्हणाला, ‘मी घोड्यावर बसतो, तुम्ही हत्तीवर बसा. एवढे माझे ऐका.’

आपल्या मित्राचे उपकार व प्रेम लक्षात आणून राजपुत्राने संमती दिली. चारचौघांसमक्ष आपला जरा अपमान झाला असे थोडे मनात त्याला वाटले, परंतु क्षणभरच. मिरवणूक सुरू झाली. राजपुत्र व त्याची पत्नी अंबारीत बसली. प्रधानपुत्र घोड्यावर शोभत होता. मंडळी राजधानीजवळ आली. शहरातून सरदार दरकदार सामोरे आले होते. लाह्या, फुले, मोती उधळण्यात आली. दरवाजातून मिरवणूक आत शिरणार, इतक्यात प्रधानपुत्र खाली उतरला व म्हणाला, ‘हा दरवाजा आधी पाडा व मग राजपुत्र आत जाऊ दे.’

राजपुत्राला राग आला. आनंदाचा व उत्सवाचा सर्व विरस होणार याचे त्याला वाईट वाटले, परंतु उपकाराच्या ओझ्याखाली तो दबला होता. शेवटी दरवाजा पाडण्यात आला व मिरवणूक शहरात गेली.

राजाने मोठी थाटाची पंगत देण्याचे ठरविले. रात्री आठ वाजता पंगत होती. मोठा मंडप घातला होता. किनखापाने शृंगारला होता. तेथील थाट काय सांगावा ? पंगतीची तयारी झाली. खाशा स्वाऱ्या तयार झाल्या. राजपुत्र पहिल्या पानावर बसला. त्याच्याजवळ त्याच्या मित्राचे पान होते. मंडळी आता जेवावयास आरंभ करणार, इतक्यात प्रधानाच्या मुलाने राजपुत्राच्या ताटातील उत्कृष्ट जातीचा तो मासा उचलून घेतला. भर पंक्तीत अपमान! राजपुत्र रागाने लाल झाला. परंतु करतो काय?

जेवणे झाली. राजपुत्र आपल्या मित्रास म्हणाला, 'तू चालता हो. तुझे मला दर्शन नको. आज सकाळपासून मी पाहातो आहे. किती अपमान सहन करावे? काही मर्यादा आहे की नाही सहनशीलतेची? अत:पर हे मला सहन होत नाही. माझा पदोपदी पाणउतारा आणि सर्वांसमक्ष! जा, पुन्हा तोंड दाखवू नकोस.' असे म्हणून राजपुत्र तणतणत निघून गेला.

प्रधानपुत्र रागावला नाही. प्रेम सर्व अपमान पोटात गिळते. निंदा, अपमान, तिरस्कार सहन करून जे टिकेल तेच खरे प्रेम. प्रधानपुत्र मनात म्हणाला, 'अजून एक वेळ माझी जरुरी आहे. मग मी चालता होईन' तो राजपुत्राच्या झोपण्याच्या खोलीत आधीच लपून बसला. दमला भागलेला राजपुत्र झोपी गेला. पलंगाखालून बाहेर येऊन प्रधानपुत्र नागवी तलवार घेऊन उभा होता. एकाएकी एक नाग आला व पलंगावर चढू लागला. प्रधानपुत्राने एका वारानेच त्याची खांडोळी केली. घाव इतका जोराचा बसला की रक्ताची चिळकांडी उडाली. राजपुत्राचा हात पांघरुणाच्या बाहेर होता. त्या उघड्या हातावर रक्त उडाले. प्रधानपुत्राच्या मनात आले की ते हळूच पुसावे. त्याने हलक्या हाताने ते रक्त पुसले, परंतु राजपुत्र जागा झाला.

'काय, अजून तू इथेच? आणि हातात तलवार? माझा खून करावयास आलास? मारेकऱ्या दुष्टा-' राजपुत्र संतापाने वेडा झाला.

प्रधानपुत्र म्हणाला, 'महाराज, तुमचे प्राण वाचवण्यासाठी हा दास येथे लपला होता. आज सर्प येऊन तुम्हास दंश करणार हे मला कळले होते, म्हणून मी येथे आलो. हा पाहा सर्प मरून पडला आहे.'

राजपुत्राने सर्प पाहिला. 'मला मारावयास आलेला तू, तुला दुष्टालाच दंश करावयासाठी हा सर्प येत होता. मला दंश करावयास का येईल? वाहवा रे



मित्र! मित्राला मारणारा मित्र!' राजपुत्र तिरस्कार, उपहास व संताप याने बोलत होता.

प्रधानपुत्र म्हणाला, 'मी जे आज सकाळपासून वर्तन केले, ते तुमचे प्राण वाचवण्यासाठी. मला सर्व हकीगत तुम्हास सांगता येत नाही. कारण ती जर मी सांगेन, तर मी दगड होऊन पडेन.'

राजपुत्र म्हणाला, 'थोतांड! शुद्ध ढोंग. सारी लफंगेगिरी. म्हणे दगड होऊन पडेन! सांग, सारी हकीगत सांग. झालास दगड तर झालास. सांग.'

प्रधानपुत्र म्हणाला, 'ठीक़, मित्राची तुम्हाला जरूर नसेल तर मी तरी कशाला जगू? तुमचे प्राण वाचवण्यासाठी मी जगू इच्छित होतो. अतःपर तुम्हास धोका नाही. मी मेलो तरी चालेल. ऐका. काल रात्री पाखरांचा संवाद मी ऐकला. तुम्ही झोपला होतात. मी पहारा करीत होतो. नर मादीला म्हणाला, 'ज़र घोड्यावरून राजपुत्र गेला तर तो घोडा पडेल व राजपुत्र मरेल.' म्हणून मी तुम्हाला घोड्यावर बसू दिले नाही. अपमान करण्याचा माझा हेतू नव्हता.'

प्रधानाचा मुलगा एवढे म्हणून थांबताच गुडघ्यापर्यंत तो दगडाचा झाला. तो राजपुत्रास म्हणाला, 'पाहा माझे पाय दगडाचे झाले. पुढे सांगू का?'

'सांग. सर्व सांग.' राजपुत्र म्हणाला.

'राजपुत्र दरवाजातून आत जाताच दरवाजा अंगावर कोसळून राजपुत्र मरेल. तो आधी पाडला तर राजपुत्र जगेल, असे ती पाखरे म्हणाली. म्हणून मी दरवाजा पाडवला.' प्रधानपुत्र एवढे म्हणताच कमरेपर्यंतचा भाग पाषाणमय झाला.

'पाहा, कमरेपर्यंत मी दगडाचा झालो. आणखी सांगू का?' प्रधानपुत्राने विचारले.

'सांग. पुन्हा पुन्हा काय विचारतोस?' राजपुत्र म्हणाला.

'राजा मेजवानी देईल, त्या वेळेस राजपुत्राच्या ताटात एक उत्कृष्ट जातीचा मासा तळून वाढलेला असेल. जर राजपुत्र तो खाईल, तर तो मरेल.'

प्रधानपुत्र एवढे म्हणताच मानेपर्यंतचा भाग दगडाचा झाला.

'आणखी सांगू का?' प्रधानपुत्राने विचारले.

'सांग म्हणून कितीदा सांगू?' राजपुत्र म्हणाला.

'आता शेवटची गोष्ट सांगताच मी सर्व दगडाचा होईन. मागून तुला पश्चात्ताप होऊन आपला मित्र जिवंत व्हावा असे वाटले तर त्याला एकच उपाय आहे. तुला जे पहिले मूल होईल, ते मारून त्याच्या रक्ताने ह्या माझ्या दगडाला स्नान घाल म्हणजे मी उठेन; परंतु मला उठण्याची इच्छा नाही. मी मित्रावर प्रेम केले. माझे काम झाले. ऐक, शेवटची त्या पाखरांची गोष्ट ऐक. ती म्हणाली, राजपुत्र झोपला म्हणजे एक सर्प येऊन पलंगावर चढेल व दंश करील. जर कोणी तो सर्प आधी मारील तर राजपुत्र जगेल.' एवढे म्हणत आहे, तोच प्रधानाचा मुलगा सबंध पाषाण होऊन पडला.

राजपुत्र आता विचार करू लागला. आपला मित्र किती थोर मनाचा होता ते मनात येऊन तो रडू लागला. त्या दगडावर तो अश्रूंचा वर्षाव करू लागला. परंतु तेथे अश्रूंचा उपयोग नव्हता. त्याला होणाऱ्या पहिल्या मुलाचे रक्त पाहिजे होते.

दुसऱ्या दिवशी राजपुत्राने सारी कथा आपल्या पत्नीस सांगितली व म्हणाला, 'आपले पहिले मूल द्यावयाचे का? तुला धैर्य होईल का?' त्याची पत्नी म्हणाली,

'देवाची कृपा असेल तर आणखी बाळे होतील; परंतु आपला मित्र जगवला पाहिजे. त्याचे उतराई झालेच पाहिजे.'

राजपुत्र व त्याची पत्नी त्या पाषाणाची रोज पूजा करीत. प्रधानाचा मुलगा कोठे गेला कोणास समजेना. कोणी म्हणे राजपुत्राचे व त्याचे भांडण झाले, म्हणून तो देशांतरी निघून गेला. प्रधानाला दुःख झाले, प्रधानपुत्राची पत्नी दुःखी झाली. म्हाताऱ्या प्रधानाला सुनेचे दुःख पाहवेना. शेवटी सून माहेरी गेली. ती रोज देवीची आराधना करी व म्हणे, 'आई, जगदंबे माझे कुंकू घरी आण, माझे चुडे अभंग ठेव. मी तुझी मुलगी. माझे सौभाग्य तुझ्या हाती. तू ते सांभाळ.'

काही दिवस गेले, काही महिने गेले. राजपुत्राला मुलगा झाला. परंतु तो आनंद टिकणारा नव्हता. मित्र का पुत्र हा प्रश्न होता. पुत्र आणखी होतील; परंतु असा मित्र मिळायचा नाही असा उभयतांनी विचार केला. राजपुत्र व त्याची पत्नी ते ताजे फूल, ते नवीन कोवळे मूल घेऊन दिवाणखान्यात आली. दोघांनी हृदय घट्ट केले. राजपुत्राने मुलाला मारले व रक्ताची धार त्या दगडावर धरली. दगड खडबडून जागा झाला. मित्र मित्रासमोर उभा राहिला. समोर पाहातो तो मारलेले मूल, कुसकरलेले फूल. प्रधानपुत्राला वाईट वाटले, ते मुलाचे तुकडे त्याने रुमालात बांधून घेतले व म्हणाला, 'याला जिवंत करून आणीन, तेव्हाच तोंड दाखवीन.'

प्रधानाचा मुलगा निघाला. हातात ती मृत मुलाची मोटली होती. तो आपल्या सासुरवाडीस जावयास निघाला. पत्नीला भेटण्यासाठी पत्नीच्या माहेरी तो जात होता. गाव जवळ आला. प्रधानाच्या मुलाने ती मोटली एका झाडावर लपवून ठेवली व एकटा सडाच सासऱ्याच्या घरी आला. पती सुखरूप आला हे पाहून पत्नीस आनंद झाला; परंतु तो तिचा आनंद टिकला नाही. पती हसेना, बोलेना. पती दुःखी व कष्टी दिसत होता. आपले काय पाप आहे ते पत्नीला कळेना. आपल्यापासून पतीस सुख नाही तर कशास जगावे असे तिला वाटले. रात्री देवीच्या देवळात जाऊन जीव द्यावा असे तिने ठरविले.

प्रधानाचा मुलगा झोपेचे सोंग घेऊन पडला होता. तो खोटे खोटे घोरत होता ती साध्वी उठली व निघाली आपली पत्नी कोठे जाते ते पाहाण्यासाठी पाठोपाठ प्रधानपुत्रही निघाला. त्याची पत्नी देवळात शिरली व देवीला हात

जोडून म्हणाली, 'आई जगदंबे! आजपर्यंत प्रार्थना ऐकलीस, माझा पती परत आणलास; माझे सौभाग्य सुखरूप आणलेस. परंतु आई! त्यांना मी नको. मला पाहून त्यांना आनंद नाही. त्यांना पाहून माझे हृदय उचंबळते, परंतु मला पाहून ते दुःखीच राहिले. ते हसत नाहीत, बोलत नाहीत. नीट खातपीत नाहीत. मी कशाला जगू? तुझ्या पायांवर डोके फोडते. मुलीला क्षमा कर.'

असे म्हणून ती साध्वी पतिव्रता डोके आपटणार, तो देवीने तिला पोटाशी धरले. देवी म्हणाली, 'बेटा, असे करू नकोस. हा वेडेपणा आहे. पतीला त्याचे दुःख विचार. बोलल्याशिवाय, विचारल्याशिवाय कसे कळणार? त्यांचे काय दुखते खुपते, ते विचार. जा, त्यांचे दुःख मी दूर करीन. उद्या त्यांना विचारून ये.'

ती पतिव्रता आनंदली व माघारी आली. प्रधानपुत्र हळूच आधी येऊन परत घोरत राहिला. दुसऱ्या दिवशी त्या पतिव्रतेने पतीस दुःखाचे कारण विचारले. तो म्हणाला, 'तुझा पती तू जिवंत पाहात आहेस; परंतु तुझा पती तुला मिळावा म्हणून राजपुत्राने पहिल्या मुलाचा बळी दिला आहे. त्या मुलाचे तुकडे मी आणले आहेत. ते जिवंत करून आण तर तू खरी पतिव्रता. ते बालक जिवंत होईल, तरच मी हसेन. आनंदाने जगेन, नाही तर मी जीव देईन.' पतीचे बोलणे तिने ऐकून घेतले व म्हणाली, 'रात्री आपण दोघे देवीच्या देवळात जाऊ. तुम्ही तुकडे घेऊन या. आई जगदंबा बाळ जिवंत करील. चिंता करू नका.'

उभयता रात्रीची वाट पाहत होती. रात्र झाली. सारे जग झोपी गेले. ती दोघे मृत मुलाला घेऊन मंदिरात गेली. ती पतिव्रता जगदंबेस म्हणाली. 'आई, या मुलाच्या बलिदानाने माझा पती मला परत मिळाला. या बाळाला जिवंत कर, या बाळाला हसव. याला जिवंत करशील तर माझे पतिदेव जिवंत राहातील. या मुलाला हसवशील तर ते हसतील. आई, लाव, तुझा अमृताचा हात या कोवळ्या तुकड्यांना लाव.'

देवीने हात लांबवला व त्या तुकड्यांस लावला. एकदम बाळ हसू खेळू लागले. प्रधानाचा मुलगा पत्नीसह ते मूल घेऊन राजधानीस आला. सर्वांना आनंद झाला. राजाने राजपुत्रास गादीवर बसविले व प्रधानाच्या मुलास मुख्य प्रधान केले. राजा व प्रधान म्हातारे झाले होते. ते वनात संन्यासी होऊन

तप करू लागले. इकडे नवीन राजा व नवीन प्रधान चांगल्या प्रकारे राज्य करू लागले. प्रजा सुखी झाली. कोणी रोगी नाही, दुःखी नाही, कुणाचा छळ नाही. शेते पिकत होती, पाऊस वेळेवर पडत होता. उद्योगधंदे भरभराटीत होते. सारे सुशिक्षित होते. बेकार कोणी नव्हता, आळशी कोणी नव्हता, अनुदार कोणी नव्हता. जुलमी कोणी नव्हता. सारी प्रजा नव्या राजाला व नव्या प्रधानाला दुवा देत होती. आनंदीआनंद होता.

तुमच्या आमच्या देशात तसा आनंद येवो, दुसरे काय?

गोष्ट संपली माझी
फुले आणा ताजी ।।
देवा वाहू फुले
नाचू आपण मुले ।।
या रे या रे सारे
गाणे गोड गा रे ।।
देव आहे मोठा
नाही कुणा तोटा ।।
नाही जगी दुःख
आहे जगी सुख ।।

□ □ □

समाप्त

□ □ □

# साने गुरुजींच्या गोड गोष्टी : १ ते १०

## भाग पहिला : खरा मित्र

आवडती नावडती, तीन मडकी, न्याय देणारा गुराखी, गोसावी, सोन्याची साखळी आणि खरा मित्र अशा या सहा गोष्टी जिव्हाळा आणि ध्येयनिष्ठा निर्माण करतात.

## भाग दुसरा : घामाची फुले

या नऊ विविध गोष्टी म्हणजे मुलांना मेजवानीच ! मनोरंजनाबरोबरच नीतिमूल्यांचे दर्शन घडविणाऱ्या या गोड गोष्टी प्रत्येकाच्या जीवनात ध्येय निर्माण करतील.

## भाग तिसरा : मनूबाबा

सिलास मार्नरची ही भावपूर्ण कथा. ज्यावेळेस जीवनाचा उपयोग एखाद्या ध्येयासाठी होऊ लागतो तेव्हाच जीवनाचा विकास होऊ लागतो. जीवनाला अर्थ प्राप्त होऊ लागतो.

## भाग चौथा : फुलाचा प्रयोग

कृष्णकमळीच्या फुलावर सोनेरी छटा उमटवून दाखविणाऱ्याला एक लाख रुपयांचे बक्षीस जाहीर केलेले होते. फुलाला मिळाले का ते ? भावपूर्ण हृदयस्पर्शी कथा.

## भाग पाचवा : दुःखी

व्हिक्टर ह्यूगोच्या 'ला मिझरेबल' ची ही हृदयस्पर्शी कथा. वालजी चोर होता. एका साधूने त्याला आपली चूक सुधारण्याची एक संधी दिली आणि वालजीचा महात्मा झाला.

## भाग सहावा : सोराब नि रुस्तुम

वडील आणि मुलगा यांचे अनोळखी अवस्थेतील द्वंद्व आज जगात अजरामर झाले आहे. या पुस्तकातील इतर चार कथाही मनाचा वेध घेणाऱ्याच आहेत.

## भाग सातवा : बेबी सरोजा

जीवनात कितीही संकटे आली, आपत्त्या आल्या तरी सत्य सोडू नये, दलितांविषयी प्रेमभाव ठेवावा. परमेश्वरावर विश्वास ठेवावा. हे पटवून देणारी तामीळ भाषेतील हृदयस्पर्शी कथा.

## भाग आठवा : करुणा देवी

शिरीष करुणेला विसरला पण करुणेने कर्तव्याचा सुगंध दरवळत ठेवणारी आपली ज्योत सतत तेवत ठेवली आणि शिरीषच्या अंतरातील विझलेला दीप पुन्हा लावला.

## भाग नववा : यती कि पती

यती होण्यासाठी संसाराचा त्याग करण्याचा प्रयत्न विजयने केला; परंतु मुक्तीचा मार्ग आपल्या सारख्या भावनोत्कट वृत्तीच्या माणसाला अनुरूप नाही हे त्याला पटले.

## भाग दहावा : चित्रा नि चारू

चित्रा नि तिची मुसलमान मैत्रीण फातमा. मैत्रीच्या कर्तव्यापासून निर्माण झालेली चित्रा नि चारूची ही करुणरम्य कथा चित्राच्या वडिलांच्या प्रेमाचीही साक्ष पटविते.


## केशव भिकाजी ढवळे

श्रीसमर्थ सदन, पहिली भटवाडी, गिरगांव, मुंबई ४